# अनुक्रमाणिका

*॥ अल्लाह असीम दयावंत व कृपावंत च्या नावाने ॥*

# दोन शब्द

आपल्या हातातील हे पुस्तक माझ्या काही लेखांचा संग्रह आहे. हे लेख वेगवेगळ्या कालखंडात लिहिले गेले असले तरी त्यांच्यात एक विशिष्ट प्रकारचा संबंध आढळून येतो. प्रत्येक सुज्ञ व्यक्तीला आपल्या जीवनात तोंड द्याव्या लागणाऱ्या काही मुलभूत प्रश्नांबाबत हे लेख लिहिले गेले आहेत. धर्मांमध्ये आमच्या समस्यांचे समाधान कोणते आहे, हे या लेखांद्वारे स्पष्ट होईल. इस्लाम हा नवीन धर्म नसून ते सत्य-धर्माचे प्रामाणिक व पूर्णरूप आहे.

वाचक या पुस्तकाचे गांभिर्य पूर्वक अध्ययन करतील अशी आशा आहे, गंभीर चिंतन आणि सखोल अध्ययनामुळेच जीवनात गांभिर्य व शालीनता येते. जीवनास पवित्र, सुंदर, सुलभ आणि मधुर बनविण्यात विचार व चिंतनाच्या याच व्यापकतेचा संपूर्ण सहयोग मिळत असतो.

विनित
**मु. फारुक खान**

दिल्ली
२३ ऑगस्ट १९७१

# इस्लाम म्हणजे काय

(जयपूर राजमहालात सुरु असलेल्या एका विशेष कार्यक्रमात ११ जून १९७१ रोजी रात्री इस्लामचा परिचय करून देण्याच्या उद्देशाने हा लेख सादर करण्यात आला. कार्यक्रमात प्रतिष्ठित व्यक्तींबरोबरच राजमाता गायत्रीदेवी देखील उपस्थित होत्या.)

आदरणीय सभापती महोदय, परम माननीय राजमाता आणि बंधू-भगिनींनो !

माननीय राजमाता यांनी आपल्या परम माननीय पति जयपूर नरेश महाराजाधिराज सवाई १००८ श्री मानसिंगजी यांच्या पुण्यतिथी निमित्त सर्वधर्म संमेलन आणि विभिन्न संप्रदायांच्या व मतांच्या विद्वानांच्या प्रवचनांचे आयोजन केले, ही अत्यंत प्रशंसनीय बाब असून अनेक दृष्टिकोनातून ती अनुकरणीय देखील आहे. अशा प्रकारे जयपूरच्या राजमातांनी आपल्या पतिमहोदयांच्या प्रति आपले अगाध प्रेम व अपार श्रध्देचे दर्शन घडविले आहे. त्याचबरोबर त्यांनी एक भारतीय नारी असल्याच्या नात्याने विविध पंथांना व संप्रदायांना समान दृष्टीने पाहण्याच्या आपल्या विशाल हृदयतेचा देखील परिचय दिला आहे. जीवनास वास्तविक व व्यापक दृष्टिकोनातून पाहण्याचे कार्य मग ते कोणत्याही निमित्ताने का असेना, सराहनीयच असते.

या अनुषंगाने इतर पंथ व धर्मांबरोबर इस्लामच्या बाबतीत देखील विचार प्रकट करण्याची सूचना करण्यात आली आहे. हे आमचे सौभाग्यच म्हणावे लागेल. 'इस्लाम म्हणजे काय ?' या विषयावर मी अत्यंत संक्षिप्तपणे प्रकाश टाकण्याचा प्रयत्न करीन.

# इस्लामचा उद्देश

बंधुनो ! इस्लाम भारतात जितका प्रसिध्द झाला आहे तितंकाच कमी प्रयत्न त्यास समजून घेण्याचा झाला आहे. इस्लामवर त्याच्या विविध पैलू नुसार विचार केला जाऊ शकतो आणि केला जात आहे. परंतु त्याच्या सर्व पैलूंचा परस्पर घनिष्ट संबंध आहे, त्यापैकी कोणताही एक पैलू वेगळा करून त्याचे अध्ययन करता येणे शक्य नाही, ही गोष्ट सर्वसाधारणपणे विसरली जाते. इस्लाम आमच्या व्यक्तिमत्वाच्या पूर्णत्वाचेच दुसरे नाव आहे, ह्या त्याचा एक विशेष पैलू आहे. कुरआनच्या अध्ययनाने एक विशेष ईश्वरीय नियम आढळून येतो तो म्हणजे - वस्तूचे आपल्या अभिप्राय व उद्देशाकडे अग्रेसर असणे. या नियमानुसार वस्तू आपले लक्ष्य गाठतात. त्याचप्रमाणे याच नियमानुसार त्या पूर्ण व त्रुटीरहित देखील असतात. कुरआनमध्ये या नियमाचा उल्लेख अशा शब्दांत करण्यात आला आहे.

**अल्लज़ी आता कुल्ल शैइन ख़लाक़हू सुम्म हदा** २०:५०

**अर्थात** - "ईश्वराने प्रत्येक वस्तूला तिचे स्वरूप प्रदान केले, मग तिला मार्ग दाखविला."

विश्वातील प्रत्येक वस्तूला जे स्वरुप रुप-रंग, गुण (Nature) आणि विशेषता लाभली आहे. ती खऱ्या अर्थाने ईश्वराचीच देन आहे. आणि ईश्वरच प्रत्येकाला त्याचा मार्ग दाखवितो. आणि त्याच्या दिशा-निर्देशनाचे आयोजन करतो. चिमण्यांना ईश्वराकडून फक्त पंखच मिळाले नसून त्या हवेत उडायला देखील त्याच्याचकडून शिकल्या आहेत. मासे पाण्यात पोहायला आणि मधमाश्या मध गोळा करायला त्याच्याच कडून शिकल्या आहेत.

जर त्याने मार्ग दाखविला नसता तर कोणतीही वस्तू आपला नैसर्गिक उद्देश पूर्ण करू शकणार नाही. मग अशा स्थितीत वन उपवनात फूल उमलणार नाहीत की, पृथ्वीवर कुठेही हिरवळ

दिसू शकणार नाही. फुलांना सुगंध येणार नाही आणि कोकिळा आपला गोड गळा विसरून जाईल.

या विशिष्ट नियमाकडे कुरआनमध्ये आणखी एके ठिकाणी अशा शब्दात निर्देश केला आहे.

**सब्बहिस्म रब्बिकल आला, अल्लज़ी ख़लक फ़सव्व, वल्लज़ी क़द्दर फ़हदा, वल्लज़ी अख़रजल मरआ, फजअल गुसाअन अहवा** ८७:१-५

**अर्थात** - "आपल्या सर्वोच्च पालनकर्त्या प्रभुच्या नावाचे पावित्र्यगान करा ज्याने निर्माण केले, मग प्रमाणबध्दता प्रस्थापित केली आणि ज्याने भाग्य बनविले मग मार्ग दाखविला, ज्याने वनस्पती उगविल्या, मग त्यांना घनदाट व हिरवेगार बनविले."

सारांश असा की, त्याने निर्मितीच केली नाही तर चांगले स्वरुप देखील प्रदान केले. मग त्याने वस्तूंना सुंदर रुप आणि स्वभाव व सुंदर गुण दिले. इतकेच नव्हे तर उद्देश व लक्ष्याकडे त्यांना अग्रेसर देखील केले. आपण पाहतो की तो धरतीवर गवत व चारा उगवितो आणि मग त्यांच्यात ज्या योग्यता व क्षमता अस्तित्वात असतात त्यांना विकसित होण्याची व्यवस्था देखील तो करतो. मग आम्ही पाहतो की, लहान-लहान अंकुर वाढतात आणि मग ते अत्यंत घनदाट, हिरवेगार व आकर्षक बनतात.

# इस्लामचा अर्थ

या व्यापक ईश्वरीय नियमापासून मानव अलिप्त नाही. ईश्वराने मानवाची फक्त सृष्टीच बनविली नसून अस्तित्व प्रदान करून त्याला त्यांचा उद्देश पथ देखील दाखवून दिला आहे. मानवाला आपला वास्तविक जीवनउद्देश प्राप्त करता यावा आणि आपले जीवन पूर्ण करता यावे याकरिता ईश्वराने त्यास मार्ग दाखविला आहे. हे मार्गदर्शन आणि त्याचे अनुसरण व पालन यासच अरबी भाषेत 'इस्लाम' असे नाव देण्यात आले आहे. आता आपल्या लक्षात आले असेल की इस्लाम ईश्वरीय इच्छेचे पालन आणि त्याच्या योजनेनुसार आचरण करणे व त्यास फलिभूत पाहण्याच्या मनोकामनेचे दुसरे नाव आहे, या व्यतिरिक्त काहीही नाही. ईश्वराची इच्छा सत्य मंगल आणि सुंदर आहे. यानुसारच मानवाची रचना झाली आहे. ईश्वरीय इच्छा आणि त्याच्या योजनेचा परिचय स्वतः मानवाच्या अस्तित्वामुळे होतो. दुसऱ्या शब्दात ईश्वराला आमच्याकडून जे काही अपेक्षित आहे. तोच आमचा स्वभाव आहे. हेच कुरआनमध्ये अशा शब्दात व्यक्त करण्यात आले आहे.

**फितरतल्लहिल् लती फ़तरन, नास अलैहाला, तबदील लिख़लक़िल्लाह ज़ालिकद्दीनुल कैय्यिम** ३०:३०

**अर्थात** - "दृढ बना त्या प्राकृतिक स्वभावावर ज्यावर सर्वश्रेष्ठ अल्लाहने मानवजातीला निर्माण केले आहे. अल्लाहने केलेली रचना बदलली जाऊ शकत नाही. हाच अगदी रास्त आणि योग्य धर्म आहे.

म्हणजेच हा धर्म मानवजातीचा स्वाभाविक धर्म आहे. हा धर्म आमच्या गुणधर्म व स्वभावास नष्ट करीत नाही. याचे ज्ञान वास्तविकपणे आपला स्वभाव व आपल्या गुणधर्मांचे ज्ञान आहे. यांच्या विरुध्द जाणे म्हणजे आपले निर्मळ स्वरुप नष्ट करण्यासारखे आहे. हीच गोष्ट हजरत मुहम्मद (स.) यांनी पुढील शब्दांत व्यक्त केली आहे.

"जन्मास येणारे प्रत्येक मूल आपल्या गुणधर्मानुसारच जन्माला येत असते. (सर्वसामान्यपणे त्याचे आई-वडीलच त्याला पथभ्रष्ट करतात)" मग त्यांनी आपले हे वक्तव्य आणखीन स्पष्ट करून सांगितले की, "हे त्याप्रमाणे आहे जसे जनावराच्या पोटी पूर्णतः सदृढ जनावर जन्म घेते.

कोणतेही मूल फाटके कान घेऊन येत नाही. नंतर लोक अंधविश्वासामुळे त्यांचा कान कापून त्यास कानफाटक्या बनवितात.''

या उदाहरणावरून हेच स्पष्ट होते की, आपल्या स्वाभाविक आणि ईश्वरद्वारा निर्धारित धर्माचा त्याग करून मानव आपल्याच व्यक्तिमत्वास आघात पोहोचवीत असतो.

## मानवाचे कोमल अंग

मानवी अस्तित्वाचे सर्वात कोमल अंग त्याचे हृदय आहे. आपल्या मधुर व कोमल अंगाचे रक्षण होईल अशा पध्दतीचा व प्रणालीचा (Way of Life) जीवनात अवलंब करण्याची मानवाची स्वाभाविक इच्छा असते.

इस्लामची वास्तविकता आणि त्याचे मूलतत्व समजून घेतल्यानंतर स्वाभाविक धर्म असल्याकारणाने तो आमची ही मागणी संपूर्णतः पूर्ण करतो, या गोष्टीवर पूर्णपणे विश्वास बसतो. तो आमच्या जीवनातील सर्वात कोमल आणि मधुर अंगाचा रक्षकच नसून यापूर्वी सांगितल्याप्रमाणे तो त्यांना विकसित व पूर्णत्वाच्या स्थितीत पाहू इच्छितो. कुरआनमध्ये स्पष्ट शब्दांत या तथ्यावर प्रकाश टाकण्यात आला आहे. कुरआनचे शब्द असे आहेत.

**क़द अफ़लह मन ज़क्काहा व क़द मन दस्साहा** (९१:७-१०)

**अर्थात** - ''सफल झाला तो ज्याने अंतःकरणाची शुध्दी केली आणि विफल झाला तो ज्याने त्याला दाबून ठेवले.''

मानवाने आपल्या आत्म्यास विकसित होऊ न देणे आणि त्यास दूषित व विकृत बनविणे हा त्याचा सर्वात मोठा व अक्षम्य अपराध आहे.

## पाकळ्या विखुरता कामा नयेत

इस्लाम मानवाचे व्यक्तिमत्व आणि त्याच्या सर्वात कोमल अंगाचा रक्षक आहे. तो त्यांना विकसित होण्याचा मोका देतो. यातच त्याची सार्थकता आणि यामुळेच त्याचे स्वतःचे अस्तित्व देखील आहे. इस्लाम ईश

इच्छेचे पालन आहे. म्हणायला ही किती साधी गोष्ट आहे, परंतु यातच जीवनाचे संपूर्ण रहस्य सामावले आहे. जीवनाची वास्तविक सरसता, सुंदरता व महानता खरे तर यावरच अवलंबून असते. ही सरळ व साधी गोष्ट विसरून जाल तर जीवन पुष्पाच्या पाकळ्या विखुरल्या जातील. आमच्यात एकात्मतेचा आधार बनू शकेल अशी कोणतीही गोष्ट आढळणार नाही. जगाला एका सूत्रात गुंफणारा कुणीही असणार नाही. अनेकतेत एकतेचे शुभदर्शन होणे कदापि शक्य होणार नाही. अशा प्रकारे इस्लाम मनाचा सूक्ष्म व मधुर व्यापार आहे. तो जेव्हा ईश्वराकडे निर्देशित होतो तेव्हा त्यास ईशभय, ईशप्रेम, दास्यभाव, आत्मसमर्पण, आदेशानुपालन, आदि नावांनी पुकारले जाते. आणि जेव्हा त्याचा निर्देश इतर मानव व प्राण्यांकडे होतो तेव्हा त्यास प्रेम भावना, स्नेहसंबंध, लोकसेवा, परोपकार, दया भावना इ. नावे दिली जातात. इस्लाम जीवनाचा प्रामाणिकपणा, जीवनाची वास्तविक व्याख्या आणि जीवनाची अतिशय सुंदर अनुभूति आणि सर्वांत मधुर क्रिया आहे. तो जीवनाचा पोकळ भाग कदापि नाही. तो जीवनाचा सुखद मनोवेग आणि जीवनाचा वास्तविक आनंदानुभव आहे.

मग हे लक्षात असू द्या की इस्लाम मनाचा सूक्ष्म व मधुर व्यापारच बनून राहात नसून स्वभावतः तो व्यक्तीचे संपूर्ण जीवन व समाजाचा प्रत्येक भागच नव्हे तर त्यापुढे जाऊन संपूर्ण मानवतेला आच्छादित करतो. मानवी जीवनाचा कोणताही भाग त्यापासून वंचित रहात नाही. याच कारणास्तव इस्लामने जीवनाच्या सर्व बाबींमध्ये मानवाचे मार्गदर्शन केले आहे. विचार व धारणांपासून ते नैतिक, सामाजिक, आर्थिक आणि सामाजिक आदि प्रत्येक क्षेत्रात तो आमचे मार्गदर्शन करतो. तो सांगतो की व्यक्ती व समाजाची निर्मिती कशी व्हावी ? आदर्श समाजाची रुपरेषा काय असते ? लोकांचे परस्पर संबंध कसे असावेत ? आर्थिक बाबींमध्ये संतुलित व न्यायसंगत प्रणाली कोणती असू शकते ? कशा प्रकारे मानव समान व भाऊ-भाऊ एकाच ईश्वराचे दास आणि एकाच पित्याची संतती आहेत ? मग तो सांगतो की, राज्याची व्यवस्था कशी असावी ? व्यवस्थित व न्यायानुकूल शासन चालविण्यासाठी कोणती विधान व प्रणाली मानवासाठी ग्राह्य असावी आणि कोणती प्रणाली फक्त मानवासाठी शुभ

व न्यायानुकूल नाही ? संपूर्ण मानवजातीला संघटित करण्याचा आधार कोणता आहे ? मानव समाजात न्यायाची स्थापना कशी होऊ शकते ? या सर्व समस्यांच्या बाबतीत इस्लाम स्पष्टपणे प्रकाश टाकतो आणि अशा प्रकारे तो एका जीवन व्यवस्थे च्या रूपात प्रबल होऊन समोर येतो.

## मूलभूत धारणा

मूलभूत स्वरुपात इस्लामच्या तीन मुख्य धारणा आहेत. तो एक ईश्वराकडे लोकांना आमंत्रित करतो. हे जग आपोआप निर्माण झाले नसून याचा एक रचयिता आहे असे त्याचे म्हणणे आहे. तो (ईश्वर) एक आहे. तो (ईश्वर) या जगाचा निर्माता व नियंत्रक आहे. कणा-कणांत त्याच्या निशाण्या पसरल्या आहेत. ब्रह्मांडात विविध रूपांत त्याचा दयाळूपणा, शक्ती व सामर्थ्याचे दर्शन होत आहे. कागदावर अनुमान-धपक्या स्वरुपाची अक्षरे विखुरल्याने एखादी कविता वा कथा तयार होऊ शकत नाही. मग हे कसे शक्य आहे की, एखाद्या बुध्दी, ज्ञान आणि शक्तीशाली ईश्वराशिवाय आश्चर्यकारक पध्दतीने सर्व कार्य व्यवस्थितपणे सुरु असलेले ब्रह्मांड अस्तित्वात यावे ?

## तोच एकमेवाद्वितीय

मग ईश्वर दोन अथवा अधिक असू शकत नाहीत. ईश्वर आहे आणि तो एकच आहे. दोन किंवा अधिक ईश्वरांचे अस्तित्व मान्य करणे म्हणजे कोणताही ईश्वर अपार शक्तीचा स्वामी नाही. अशा स्थितीत शक्ती व सत्ता विभक्त होऊन जाईल. जो सदैव आहे आणि ज्याचा कोणी सृष्टा नाही तोच ईश्वर आहे. यासाठी पूर्ण असणे गरजेचे आहे. शक्ती व सत्तेच्या विभाजनाच्या स्थितीत पूर्णत्व व कुशलता नष्ट होते. म्हणूनच एकेश्वरवादाची धारणाच सत्य आहे हे मान्य करावे लागेल.

## मार्गदर्शन

इस्लामची दुसरी मुख्य धारणा ती आहे जिला कुरआनमध्ये ईशदूतत्वाचे नाव देण्यात आले आहे. अगदी आरंभापासूनच म्हणजे जेव्हा मानवाने पृथ्वीवर पाय ठेवला तेव्हापासून त्याच्या मार्गदर्शनाची व्यवस्था

ईश्वराने केली आहे. त्यासाठी त्याने ईशदूत व प्रेषितांना पाठविले. आणि त्यांचे दायित्व सांगितले की, त्यांनी लोकांना सांगावे की जीवनाचे लक्ष्य काय आहे ? आणि ईश्वराला त्यांच्या कडून कोणती सेवा घ्यायची आहे ? मृत्युनंतर काय होईल ? मानवाने जीवनात कोणत्या पध्दतीचा अवलंब करावा ? त्याने जीवनासाठी कायदे व नियम कोठून प्राप्त करावेत ? आदि विषयांवर ईशदूत व प्रेषितांनी स्पष्टपणे प्रकाश टाकला आहे.

ईश्वराने मानवाच्या मार्गदर्शनासाठी आपल्या प्रेषितांवर ग्रंथ अथवा आपली वाणी देखील अवतरित केली. हे प्रेषित अथवा ईशदूत विभिन्न देशांत आणि कालखंडात होऊन गेले. त्यांच्या भाषा आणि ते ज्या जातीं समुहात जन्मले जरी वेगवेगळे असले तरी त्यांच्या मूलभूत शिकवणींमध्ये कसलाही फरक जाणवला नाही. अज्ञानपणामुळे लोकांनी त्यांचा विरोध देखील केला, त्यांच्या पश्चात त्यांच्या शिकवणींचे विकृतीकरणही केले. स्वतः त्यांचे चारित्र्य कलंकित सिध्द करण्याचा प्रयत्न देखील करण्यात आला. परंतु ईश्वर एकापाठोपाठ एक ईशदूत वा प्रेषित पाठवून सत्य आणि असत्य लोकांसमोर स्पष्ट करीत राहिला.

प्रेषितांचा हा क्रम तोपर्यंत चालत राहिला जोपर्यंत संपूर्ण जग एक (वैश्विक खेडे) होण्याची शक्यता आढळली नाही. दळणवळणाची साधने इत्यादींद्वारा नजीकच्या भविष्यात संपूर्ण विश्व एक होण्याच्या शक्यतेनंतर ईश्वराने ईशदूतत्व व प्रेषितत्वाचा क्रम समाप्त केला आणि आपल्या अंतिम प्रेषित मुहम्मद (स.) द्वारा आता जगात कोणताही नवीन प्रेषित येणार नसल्याची घोषणा केली. त्याने (ईश्वराने) आपल्या प्रेषितावर आपला अंतिम ग्रंथ देखील अवतरित केला. हा ग्रंथ तोच आहे जो कुरआनच्या नावाने आज देखील अस्तित्वात आहे. त्याचबरोबर ईश्वराने असे आश्वासन दिले की आता आपला ग्रंथ आणि मानवतेच्या नावे आपल्या संदेशाचे रक्षण तो स्वतः करील. ईश्वराकडून या आश्वासनाची पूर्तता होत राहिली आहे.

आज लोक कुरआनचे पालन भले ही करीत नसले तरी तें ईश्वरीय संदेशाला विकृत वा त्यात ढवळढवळ करू शकत नाहीत. ईश्वरीय मार्गदर्शन आज देखील कुरआन व प्रेषित मुहम्मद (स.) यांच्या

आदर्श जीवनाच्या स्वरुपात अस्तित्वात आहे आणि प्रलय काळापर्यंत अस्तित्वात राहील. वर जे काही सांगितले गेले त्यावरून हेच स्पष्ट होते की इस्लामचा इतिहास प्रेषित मुहम्मद (स.) पासून सुरु होत नसून याचा इतिहास अत्यंत प्राचीन आहे.

कुरआन हा काही नवीन ग्रंथ नाही अथवा त्याच्या शिकवणी मूलभूत स्वरुपात नवीन नसून ती ईशग्रंथांची अंतिम आवृत्ती आहे. कुरआनमध्ये मागील सर्व ग्रंथाचा सारांश देण्यात आला आहे. त्याने सर्व ग्रंथांना आपल्यात समाविष्ट करून घेतले आहे. म्हणूनच ईश्वराने त्यास ''मुहैमिन'' अर्थात संरक्षणाची उपमा दिली आहे. (५:४८) याचा अर्थ असा होतो की, याद्वारे गत काळात अवतरित झालेल्या ग्रंथांचे संरक्षण झाले आहे. तो त्यांची पुष्टी करतो आणि त्यांच्या शिकवणींना जगासमोर स्पष्टपणे सादर करण्याचा कार्यभार स्वीकारून आहे.

या ग्रंथाद्वारे ज्या धर्माचे सादरीकरण होते तो कोणा जातीसमुहासाठी एखादा आयात करण्यात आलेला धर्म (Imported Religion) नसून त्यांचा स्वत:चाच सनातन व वास्तविक धर्म आहे. ज्यास एकतर तो विसरला आहे अथवा कालचक्रात पडून त्याचे रूप बदलले आहे. म्हणूनच या शिकवणी आम्हा भारतवासियांना नवीन नाहीत. तो ज्या सत्याचे प्रतिपादन करतो त्याच्या निशाण्या कोणत्या न कोणत्या स्वरुपात येथील ग्रंथ आणि परंपरांमध्ये आढळतात. कुरआन सत्य व असत्याची कसोटी आपल्या समोर ठेवतो ज्यामुळे बऱ्या वाईटाची पारख करता येणे शक्य होते. मग त्याद्वारे जीवनाची स्पष्ट पध्दत व प्रणाली समोर येते जे ईश्वराला आमच्यासाठी अभीष्ट आहे.

मी वर म्हटले आहे की, इस्लामचा इतिहास मानवाने जमिनीवर पाऊल ठेवण्यापूर्वी पासून सुरू होतो. आणि विविध भाषांमध्ये त्याचे नाव भिन्न असले तरी इस्लामच सर्व मानवांचा ईश्वर निर्धारित धर्म आहे. इतकेच नव्हे तर जर आपण व्यापक दृष्टिकोनातून विचार केला तर इस्लामचा इतिहास याच्याही पेक्षा प्राचीन असल्याचे सिध्द होईल. इस्लाम आपला आत्मा व स्वभावाच्या दृष्टिकोनातून आज्ञापालन आहे.

या आज्ञापालनाचा निर्वाह जीवनाच्या नैसर्गिक (Natural) भागात स्वाभाविकपणे होत आहे. त्यानुसार छातीत आपल्या हृदयाची स्पंदणं होतात आणि आमची जीभ बोलण्याचे कार्य करते आणि आमची फुफ्फुसे हवा आत घेतात आणि बाहेर सोडतात. ईश्वरीय आज्ञेचे पालन जीवनाच्या त्या भागात देखील अभीष्ट आहे ज्यात मानव स्वत:ला स्वतंत्र समजतो अर्थात विचार, कल्पना, आचरण आणि कर्म या क्षेत्रात त्याने कोणती नीती ग्रहण करावी आणि कोणता मार्ग अवलंबावा ही समस्या त्याच्यापुढे अत्यंत प्रबळ स्वरुपात येते. जीवनाच्या या क्षेत्रात देखील मानवाने ईश्वराचा आज्ञाकारी बनावे हा इस्लाम आहे. ईश्वराची आज्ञा आणि त्याच्या आदेशांचे ज्ञान त्याला प्रेषितांद्वारे प्राप्त होते. प्रामाणिक व पूर्ण स्वरुपात या बाबतचे ईश्वरीय आदेश अंतिम प्रेषितांच्या शिकवणी आणि ईश्वराकडून सादर करण्यात आलेला ग्रंथ कुरआनात अस्तित्वात आहेत.

नैसर्गिक क्षेत्रात ब्रह्मांडातील सर्व वस्तू ईश्वरीय आदेशाचे पालन करीत आहेत. आणि तेव्हापासून करीत आहेत जेव्हापासून त्या अस्तित्वात आल्या आहेत. इतकेच नव्हे तर त्यांना हे अस्तित्वच आदेशानुपालनाच्या स्वरुपातच लाभले आहे. आमच्या व विश्वातील सर्वच वस्तूंच्या अस्तित्वाचे मूलत्त्वे आदेशानुवर्तन व आत्मसमर्पणच आहे. अस्तित्वाच्या कल्पनेने ईश्वरीय योजनेचे पालन केले नसते तर कोणत्याही वस्तूचा आविर्भाव शक्य झाला नसता. सृष्टि योजनेमागे कोणताही अनिष्ट व अप्रिय उद्देश नसून यामागे अत्यंत मधुर उद्देश कार्यरत आहे. म्हटले गेले आहे की "आनन्दाद्येव सर्वांनि भूतानि जायन्ते" अर्थात प्रत्येक वस्तूची निर्मिती आनंदापासून होते. या पैलू मुळे इस्लामचा इतिहास सृष्टीशी जुळला आहे.

**सत्य धर्मात जीवनाच्या सुंदरतेचे निरीक्षण करता येते. सत्य धर्म मानवाची केवळ साधनाच नसून सौंदर्य साधना देखील असते.**

True sweet hearting leads to true religion.

अर्थात सत्य आणि मधुर हृदय सत्य धर्मांकडे नेते.

## मरणोत्तर जीवन किंवा परलोकवाद

इस्लामची तीसरी मुख्य धारणा 'आखिरत' परलोकवाद अथवा मरणोत्तर जीवन या नावाने ओळखली जाते.

'आखिरत' ने अभिप्रेत ते जीवन जे मरणोत्तर प्रदान केले जाईल. परलोकवादाच्या धारणेमुळे ही दुनिया खेळ-तमाशा आणि क्रीडा बनून जाते. घुष्पित होऊन आपला सुगंध पसरवून सदा सर्वदा मातीत मिसळून जावे' यामुळे फुलाच्या जीवनाचा अभिप्राय पूर्ण होत असला तरी मानवास केवळ भौतिक अस्तित्वच नसून त्याचे आत्मिक अस्तित्व देखील आहे.

मनुष्य अशा रमणीयतेचे स्वप्न पाहात असतो जे बाकी उरावे आणि सदैव रहावे. कधीही समाप्त न होणाऱ्या जीवनाचे त्याला अभीष्ट आहे. तो ईश्वर दर्शनाचा अभिलाषी आहे, तो ईश्वराशी कधीही न तुटणारा संपर्क स्थापित करू इच्छितो. तो आपले हृदय ज्या ईशनिष्ठेने परिपूर्ण करतो, ते त्या ईशनिष्ठेचा स्वाद सदैव घेत रहावे अशी त्याची इच्छा आहे. त्याचप्रमाणे आपल्या प्रियजनांना मृत्युने आपल्यापासून वेगळे करू दूर नेले आहे. त्यांना तो भेटू इच्छितो. तो ब्रह्मांड व जीवनाच्या निहीत रहस्यांना उघड्या डोळ्यांनी पाहू इच्छितो. जगात ज्यांना न्याय मिळाला नाही त्यांना न्याय मिळावा. अशी त्याची इच्छा असते. अत्याचाऱ्यांना त्यांच्या कर्माची शिक्षा द्यायलाच हवी असे त्याला वाटते. ज्या पीडितांची जगात याचना ऐकण्यात गेली नाही, त्यांची याचना ऐकली जावी अशी त्याची मागणी आहे. सत्यप्रिय व्यक्तींची आणि ईश्वराची देखील टिंगल करणाऱ्यांना कळायला हवे की ते किती मोठे अत्याचारी होते, अशी त्याची इच्छा आहे. आणि अत्याचाराचे फळ चांगले नसते. त्याची मनोकामना आहे की, त्या सत्यप्रिय आज्ञाधारकांना त्यांच्या कर्मानुसार बक्षिस लाभावे. त्यांना जगात सन्मान देण्यात आला नाही तर ईश्वराने त्यांना सन्मानित करावे, ज्याचे ते खरे हकदार आहेत.

## हे लोक नव्हे, ते लोक (वसतिस्थान)

त्या सर्व गोष्टी या लौकिक विश्वात पूर्ण होतीलच असे वाटत नाही. हे अकारण घडत नसते. याचे मुख्य कारण असे की, हे लोक परीक्षास्थळ आहे. हे लोक त्या नियमांचे व सिध्दांताचे पालन करण्याचे लोक आहे ज्याच्या फलस्वरुप पुढे येणाऱ्या लोकात आत्म्यांच्या आणि व्यक्तींच्या विकास व पूर्णत्वाचे दर्शन शक्य होईल. पुढे येणाऱ्या लोकात इस्लाम ज्यास 'अखिरत' (परलोक) म्हणते, परीक्षेच्या दायित्वाचा निर्वाह न करणारे अपयशी ठरतील. जे नंतर स्थायी स्वरुपात येते त्यालाच 'अखिरत' म्हणतात. अखिरत अथवा परलोक वास्तविकपणे या वर्तमान लोकांशी असंबंध असे दुसरे लोक नाही. ते याच ईहलोकाचा परिणाम आहे. कोणत्याही विशिष्ट वस्तुच्या परिणामाचा त्या वस्तुशी दृढ संबंध असतो. म्हणूनच विवेकशील व बुध्दिमान व्यक्ती एखाद्या वस्तूच्या परिणामास त्या विशिष्ट वस्तूच शोधत असतात. त्यांना प्रत्येक वस्तूत त्यांचा परिणाम, त्यांचे अंतिम रुप आणि त्यांच्या अंतिम गतीची अनुभूति होत असते. कुरआनमध्ये देखील या तथ्याचे स्पष्ट संकेत सापडतात.

**सक़ूलन फ़िस्समावाति वल अर्ज़**

**अर्थात** - ते (परलोक) आकाश व पृथ्वीमध्ये प्रबळ ठरत आहे. संपूर्ण सृष्टी त्यास डोईजड होत आहे. जर पाहण्याची व परखण्याची शक्ती असेल तर त्याची वास्तविकता याच जगात पारखली जाऊ शकते.

महाकवी इकबल यांनी किती सुंदर म्हटले आहे.

*''कयामत न कर आलमे रंग व बू पर*
*ज़मीं और भी, आसमां और भी है ।''*

**अर्थात** - तू या वर्तमान लोकाचा आश्रय घेऊ नकोस. तुझा प्रवास इथेच संपत नाही. तु दुसऱ्या लोकाचा प्राणी आहेस. तुझ्याकरिता यापेक्षाही विस्तृत क्षेत्र आहे. एका वेगळ्या ठिकाणी तुला विश्रांती घ्यायची आहे. या जीवनासच सर्वकाही समजून बसणे चुकीचे आहे. आपणास अभीष्ट असलेले जीवन अजून प्राप्त झालेले नाही. आता कुठे आमच्या अभीष्ट जीवनाची निर्मिती होऊ लागली आहे. या निर्माणकार्यात आम्ही आपले योगदान द्यायला हवे. या दायित्वाच्या निर्वाहा प्रति जर आम्ही बेसावध राहिलो तर त्याच्या वाईट परिणामांपासून आम्हाला वाचविणारा कुणीही नसेल.

# दार्शनिक दृष्टिकोन

मनुष्य पशुसारखा केवळ मोजक्या जन्मसिध्द रुढ प्रवृत्तीचा मालक नाही. तो प्रत्येक परिस्थितीमध्ये आपल्या विचारशक्तीचा वापर करीत असतो आणि त्यानुसार आपला कार्यक्रम निश्चित करीत असतो. मनुष्यातील सर्वसामान्य व्यक्ती आपल्या तात्कालिक लाभहानीच्या संबंधानुसारच विचार करू शकतो. तो जीवनातील प्रत्येक अनुभवांकडे आणि भावनांकडे वेगवेगळ्या दृष्टिकोनातून पाहत असतो. तो त्यांना एकत्र करून विचारात घेत नाही. त्यामुळेच संपूर्ण जीवनाच्या वास्तविक लाभ हानीचे ज्ञान त्याला प्राप्त होत नाही. तात्कालिक सफलतेतच तो संतुष्ट होतो, तात्कालिक सुखात तो इतका मुग्ध होऊन जातो की एखाद्या स्थायी सुखाची तो कल्पनाही करू शकत नाही. तो आपल्या वैयक्तिक अथवा सामाजिक समस्यांच्या पलीकडे विचार करण्यात असमर्थ ठरतो. हेच मनुष्याच्या पथभ्रष्ट व मार्गभ्रष्ट होण्याचे मूळ कारण आहे.

इस्लाम जो दार्शनिक सिध्दांत (Philosophical Method) आमच्या समोर मांडतो त्याच्या अध्ययनाने स्पष्ट होते की, तो लोकांना कधीही तात्कालिक यश आणि तात्कालिक सुखाच्या मोहपाशात न पडता जीवनाचे वास्तविक व स्थायी लक्ष्य सदैव आपल्या समोर ठेवण्याची दृष्टी प्रदान करू इच्छितो. तो लोकांना फक्त जीवनाचे पूर्ण व अंतिम ध्येयाचे ज्ञानच देत नसून तो त्यांना वास्तविकते पर्यंत पोहोचण्याचा मार्ग देखील मोकळा करतो. या लेखात आम्ही फक्त पुढील विषयांवरच विचार करणार आहोत. इस्लामचा दार्शनिक दृष्टिकोन कोणता ? अर्थात इस्लामने दाखवून दिलेल्या सिध्दांताचा अवलंब करून आम्ही कशाप्रकारे वास्तविकते पर्यंत पोहोचू शकतो ?

वास्तविकतेच्या (Reality) बाबतीत ज्ञान प्राप्त करण्याची सर्व साधारणपणे दार्शनिक (Philosophers) अवलंबित असलेली दार्शनिकरीती इस्लाममध्ये नाही. त्याचा स्वतःच एक दार्शनिक सिध्दांत आणि त्याची

स्वतःची एक दार्शनिक व्यवस्था आहे. इस्लामच्या मते लोकांच्या मार्गभ्रष्टेतेचे मूळ कारण असे आहे की, ते केवळ अंदाजाने वागतात आणि अनुमानालाच सत्याच्या शोधाचे एकमात्र साधन समजतात. आणि मग आपल्या अनुमानापुढे हट्टीपणा व पक्षपातामुळे कोणाचेही मत ऐकण्यास तयार होत नाहीत. अशा स्थितीत त्यांच्याकडे काल्पनिक गोष्टी आणि अनुमानां व्यतिरिक्त दुसरे काहीही नसते.

वास्तविकतेचे ज्ञान प्राप्त करण्याची पध्दत इस्लाममध्ये ही आहे की, आपण अंदाज व अनुमानाने कोणतीही गोष्ट सांगत नसलेल्या प्रेषितांचे नि:पक्षपातीपणे ऐकले पाहिजे. त्यांची कोणतीही गोष्ट काल्पनिक नसते, इतकेच नव्हे तर त्यांचे वक्तव्य ईश्वराने त्यांना प्रदान केलेल्या 'ज्ञाना' वर आधारित असते. मग त्यानंतर रहस्यमय जगताच्या बाबतीत विचार करावा आणि त्यात आढळणाऱ्या सूक्ष्म संकेतांचा क्रम लावा. त्यापासून निष्कर्ष काढून या प्रत्यक्षमार्गाला ज्याची माहिती प्रेषित देतात, या प्रत्यक्षात त्याचे लक्षण आणि त्यांच्याकडे निर्देश करणारे पुरावे आढळतात की नाही ते पाहावे. त्याच्याकडे निर्देश करणारे पुरावे सापडत असतील आणि दृश्यमय जग ते यथार्थ असल्याची साक्ष देत असतील आणि त्यापासून या वास्तविक समस्यांशी दूरून अथवा जवळचा संबंध असलेल्या सर्व समस्यांचे समाधान होत असेल तर त्यावर कसलाही आक्षेप घेतला जाऊ नये. त्याच्याविरुध्द कोणताही पुरावा सादर केला जात नसेल आणि त्याच्या मान्य करण्यात रद्द न होणारा आक्षेप घेतला गेला नसेल तर मग या प्रेषितांना खोटे ठरविण्याची कोणतीही सबब असू शकत नाही. उदाहरणार्थ आम्ही कुरआनमधील केवळ एक आयत सादर करू ज्यामुळे दर्शनाला इस्लाममध्ये किती महत्व आहे याचा अंदाज येईल.

**त्याने पृथ्वी व आकाशातील सर्वच वस्तू तुमच्या अधीन केल्या. सर्वकाही आपल्या जवळून यात मोठे संकेत आहेत त्या लोकांसाठी जे गंभीरतापूर्वक विचार करणारे आहेत.** (४५:१३)

कुरआनच्या या आयतीत ही गोष्ट सांगण्यात आली आहे की, जगातील सर्व वस्तू मनुष्याच्या सेवेत रुजू आहेत. हे पहिले ज्ञान आहे जे जगाचे अध्ययन करण्यात सर्वप्रथम आमच्यावर प्रकट होते. जगात असे अगणित प्रबंध आमच्या ज्ञानात येतात ज्यांच्याशिवाय पृथ्वी अथवा जीवन आणि जीवनातील प्रसन्नतेची कसलीच संभावना नव्हती. पृथ्वीचा सध्याचा आकार सूर्य व चंद्रापासून तिचे विशिष्ट अंतर, आपल्या धुरीवर साडे तेवीस अंश तिचे झुकणे, तिच्या अंतर्भागात आकर्षक शक्ती आढळणे इत्यादी अशा नैसर्गिक व्यवस्थेविना येथील जीवनाची कल्पना सुध्दा केली जाऊ शकत नव्हती. या व्यतिरिक्त जगात अगणित विधी व युक्त्या आपापले काम करीत आहेत. ज्याविषयी आम्हाला पूर्ण ज्ञान देखील नाही आणि त्यांना आपण योग्य प्रकारे समजू शकत नाही. या सर्व गोष्टी असताना जगातील सर्व वस्तू आमच्यासाठी आहेत याबाबत शंका उपस्थित केली जाऊ शकते काय ?

एकीकडे आपण आणि आपल्या गरजांची लांबलचक यादी आणि दुसरीकडे पसरलेले भले मोठे जग आहे. जगात मनुष्याला केंद्रीय स्थान प्राप्त आहे. जगात मनुष्याच्या गरजांची पूर्तता करण्याकरिता तमाम साधने एकत्र करण्यात आली आहेत. बाह्य जगत आणि मनुष्याच्या गरजांमध्ये अत्यंत दृढ संपर्क आहे. यावरून हेच सिध्द होते की, जगातील सर्व वस्तू मनुष्यासाठी आहेत.

जगातील तमाम वस्तू मनुष्याच्या सेवेसाठी तत्पर आहेत, ही एक अशी वास्तविकता आहे की जर मनुष्याने यावर विचार केला तर निःसंदेह तो त्यापासून असे निष्कर्ष काढू शकतो की, जे त्यावर जीवनातील बहुमूल्य तथ्ये उलगडण्यास पुरेसे असतील.

जगातील आवश्यकता पूर्तीची व्यवस्था या गोष्टीचे स्पष्ट प्रमाण आहे की, जग कोणत्याही अंध शक्तीच्या बळावर चालत नसून त्याचा कुणीतरी रचयिता व प्रबंधक आहे जो आमच्या आवश्यकता व उद्देशांच्या अंतर्गत ते चालवत आहे. जगात चोहिकडे दया, ममत्व, ज्ञान, बुध्दी व संकल्पाचा चमत्कार दिसतो. संपूर्ण सृष्टी एका दयावान आणि ममतामय ईश्वराची रचना आहे. या गोष्टीचे ज्ञान प्रदान करण्याकरिता तो पुरेसा आहे.

मानवी अस्तित्वापासून दुरवर पसरलेल्या विश्वात, पृथ्वीपासून आकाशापर्यंत पूर्णरुपेण अनुकुलता (Coordination) आढळून येते. हे विश्व कार्यरत ठेवण्यात कोणा एकाच सत्तेची इच्छा काम करीत असल्याचे प्रमाण आहे. दोन किंवा अधिक ईश्वराचे इरादे कधीच एक असू शकत नाहीत कारण सुरूवातीपासूनच त्यांचे इरादे व निर्णयांत मतभेद नसणे शक्य नाही.

जगातील या प्रत्यक्ष उदाहरणानंतर एक ईश्वराची कल्पना निर्जीव ठरत नसून तीच आमच्यासाठी सर्वांत स्पष्ट आणि उघड वास्तविकता सिद्द होते. जगात आवश्यकतापूर्तीची जी व्यवस्था आढळते ती आम्हाला एकीकडे मोठ्या वास्तविकतेचा भास करविते जे आमच्या विचार व चिंतन जगतात क्रांती घडविण्यास पुरेसे आहे. मनुष्याच्या स्वाभाविक इच्छा निरर्थक नसतात, ज्याने मनुष्यास इच्छा प्रदान केल्या आहेत तो त्यांच्या तृप्तीचे साधन देखील अवश्य संचित करतो. या जगातील मनुष्याच्या आवश्यकता पूर्तीची व्यवस्था हे उघड प्रमाण आहे.

आपल्याला अमर जीवन लाभावे ही मनुष्याची सर्वात मोठी इच्छा असते. तो मृत्यु नसलेल्या दुनियेत वास्तव्य करु इच्छितो. तो निरंतर व कधीही न संपणाऱ्या वसंताचे स्वप्न पाहू इच्छितो. सर्वसामान्य जीव-जंतूमध्ये भविष्याची कल्पना आढळत नाही परंतु याउलट मनुष्य 'उद्या'ची कल्पना करतो. भविष्याच्या कल्पनेमुळे तो सर्वसामान्य जीव-जंतूपेक्षा वेगळा ठरतो आणि त्याला उच्च स्थान प्राप्त होते. त्याला भूत व वर्तमान काळाच्या गहाळ झालेल्या धनापेक्षा अधिक महत्व नसते. त्यांच्यावर त्याला कधीही संतोष वाटत नाही. आपले जीवन समाप्त व्हावे असे त्याला वाटत नाही. तो आपल्या जीवनाची एक पूर्ण व यशस्वी जीवनाच्या स्वरुपात पुनरावृत्ती इच्छितो. मनुष्य आपल्याला लाभलेल्या 'आज' पेक्षा 'उद्या' चा जास्त अभिलाषी आहे. मानवी प्राकृतिक मागणीच या गोष्टीचे प्रमाण आहे की त्याला 'आज' च्या सारखेच 'उद्या' (भावी आयुष्य) देखील प्रदान करण्यात येईल. आपल्याला जे काही मिळालेले नाही ते मिळावे आणि जे काही आपल्यापासून गुप्त ठेवण्यात आले आहे ते गुप्त राहू नये असे मनुष्याला वाटते.

मानवी-जीवनामध्ये त्याच्या अन्य भावनांचा आदर व सन्मान आढळतो. तरीदेखील तो पारलौकिक जीवन आणि ईश्वराच्या शाश्वत कृपांचा इन्कार करीत असेल तर हा त्याचा आपल्या ईश्वराशी एक प्रकारे द्रोह आहे. हा स्वत: त्याच्या वर्तमान जीवनातील कायद्याचा इन्कार आहे. मनुष्य एखाद्याच्या संगतीत फक्त काही तास व्यतीत करुन त्याचा स्वभाव व चारित्र्य जाणून घेत असतो. ईश्वराबरोबर काही तास नव्हे तर आयुष्यभर राहण्याची गोष्ट आहे, तरीदेखील तो आपल्या ईश्वराला ओळखू शकला नाही तर यापेक्षा दुर्दैव ते कोणते ?

वरील उदाहरणावरुन या गोष्टीचा अंदाज लावला जाऊ शकतो की, प्रेषितांनी ज्या ईश्वर व परलोकाची माहिती दिली आहे ती आपल्यासाठी फक्त माहितीच नसून ते संपूर्ण जग साक्षी असलेले सत्य आहे. वरील उदाहरणावरुन ही गोष्टदेखील स्पष्टपणे समोर येते की, वास्तविकतेचे ज्ञान प्रदान करण्याकरिता इस्लामचा दार्शनिक सिद्धांत कोणता आहे ?

जीवनातील कोणताही अनुभव आमच्यासाठी गंभीर विचाराचा प्रेरक बनू शकतो. असा दृष्टिकोन आणि अशी प्रेरणा आम्हाला इस्लामपासून मिळते. जो विचार सर्व सीमा ओलांडून अंतिम अभिप्रायापर्यंत पोहोचण्याचा उद्देश बाळगत नाही वास्तविकपणे त्यास दार्शनिक विचार म्हटले जाऊ शकत नाही. दार्शनिक विचाराचे एक लक्षण असे आहे की, तो प्रत्येक प्रकारच्या पक्षपाताला व बंधनाला न जुमानता अंतिम अर्थापर्यंत पोहोचू इच्छितो. त्यात स्वतंत्रपणे गांभिर्य निश्चितच असते ज्यामुळे विचारात दृढता निर्माण होते. त्यामुळे जीवनासंबंधीच्या सर्व समस्यांचे निराकरण होते. आम्हाला सर्व प्रश्नांचे उत्तर मिळते आणि याबाबतचे सर्व आक्षेप दूर होतात.

जीवनासंबंधी काही आधारभूत प्रश्न आहेत जे सर्व विचारकांना परिचित असतात. मनुष्याचे वास्तविक स्वरुप काय आहे ? सृष्टिची अंतिम सत्ता कोणती ? त्यात मनुष्याचे वास्तविक स्थान काय आहे ? आदि. या प्रश्नांचे उत्तर देणे दर्शनाचे काम आहे. अनुभवांच्या आंतरिक अर्थांचा शोध घेणे त्याचे परम लक्ष्य आहे. अनुभवांचे पारस्पारिक विरोध दूर करणे आणि

त्यात अनुरुपता व अनुकूलता स्थापित करणे दर्शनाचे कार्य आहे. विज्ञान फक्त जग व जीवनातील वेगवेगळ्या योजनांमध्ये एका विशिष्ट सुसंघटित ज्ञानाचे प्रतिपादन करते आणि त्या ज्ञानास आपण आंतरिक ज्ञान म्हणू शकत नाही. विज्ञान केवळ प्रस्तुत वस्तू व घटनांचे वर्णन -- (Description) आहे. त्यांची व्याख्या (Interpretation) करणे दर्शनाचे काम आहे. दर्शन संपूर्ण विश्वाचे एक सामूहिक व्यवस्थित ज्ञान उपस्थित करते, ज्यात मनुष्याला जीवनातील वास्तविक यश व अपयशाचा अर्थ माहित होतो.

इस्लामने दार्शनिक स्वरुपात ती सर्व कामे केली आहेत जी वास्तवात दर्शनाची कामे आहेत. त्यांचे अध्ययन केल्यानंतर आपण आश्चर्यचकित होऊन जातो आणि यावरुन हेच स्पष्ट होते की इस्लाम कोणा मनुष्याने रचलेला धर्म असू शकत नाही. असा पूर्ण व दोषरहित धर्म केवळ ईश्वरानेच पाठविलेला असू शकतो.

इस्लामच्या दार्शनिक विचारांनी व्यक्तीच नव्हे तर संपूर्ण समाजदेखील प्रभावित व प्रेरित होतो आणि यश प्राप्त करु शकतो. सांस्कृतिक परिस्थितीबद्दल त्यामुळे नवनवीन प्रश्न प्रबळ होऊन समोर येत राहतात, मग तो एखादा प्रश्न आणि समस्या असो. अशा प्रकारे असे निश्चितच घडत असते की, विचारासाठी आपणास नवीन प्रेरक भावना मिळत असतात परंतु दार्शनिक विचाराचे हे परिणाम कधीही परिवर्तित होत नाहीत. मूळ सत्यामध्ये कधीही विकार येऊ शकत नाही. दार्शनिक क्षेत्रात देखील इस्लामचे विधिपूर्वक समर्थन केले जाण्याची आवश्यकता आहे. त्याच्याशिवाय युगातील प्रचलित तथ्यहीन दर्शनांची शक्ती क्षीण होऊ शकत नाही. याच्याविना व्यक्तीस मानसिक व आध्यत्मिक संतोष प्राप्त होऊ शकत नाही आणि मानव समाजाचे पतन देखील दूर होऊ शकत नाही.

# जीवन

जीवन काय आहे ? आणि त्याचा मूळ उद्देश कोणता ? याची दोनच उत्तरे दिली जाऊ शकतात. एक उत्तर भौतिकवाद्यांकडून दिले जाते, अर्थात जगामध्ये पदार्थच मूळ आहे. पदार्थाव्यतिरिक्त विश्व घडविण्यात दुसऱ्या कोणत्याही वस्तूचा हात नाही. शीन (Sheen) यांनी लिहिले आहे :

''जीवन प्ररसा (Peotoplasm) च्या शक्तीचे नाव आहे. मस्तिष्क अचेतन मनःरस (Psychoplasm) च्या शक्तीचे नाव आहे आणि चेतना मानव-मस्तिष्कच्या केंद्रांच्या (Associative Gentrea of Brain) शक्तीचे नाव आहे. अर्थात मानव-मस्तिष्क (Mind) शक्ती (Energy) शिवाय दुसरे काही नाही.'' *(Philosophy of Religion P.59)*

हक्सले (Huxley) लिहितो : ''ज्याप्रमाणे गति हे पदार्थाच्या रक्तक्रियेचे नाव आहे त्याप्रमाणेच चेतना हे देखील पदार्थाच्या एका क्रियेचे नाव आहे.''

मार्क्सने लिहिले आहे :

''हेगेलनुसार मानवी-मस्तिष्कांची जीवन-क्रिया, अर्थात चिंतन-क्रिया ज्याला त्याने विचार-तत्वाचे नाव देऊन एक स्वतंत्र वस्तू म्हटले आहे, ती वास्तविक जगाची मूळ प्रेरक शक्ती आहे. वास्तविक जग विचार-तत्वाचे बाह्य व घटना मूलक रुप देखील आहे. याउलट, माझ्याकरिता विचार-तत्व मानव-मस्तिष्काद्वारे प्रतिबिंबित आणि चिंतनाच्या विभिन्न रुपांत परिवर्तित बाह्य जग वगळता दुसरे काही नाही.''

*(कार्ल मार्क्स संक्षिप्त चरित्र, लेखक ब्ला इ. लोनिन)*

एंजेल्स 'डूरिंगमत-खंडन' मध्ये लिहितो :

''जगाची एकता त्याच्या अस्तित्वात नाही. जगाची वास्तविक एकता त्याच्या भौतिकतेत आहे. परंतु जर विचार व चेतना म्हणजे काय आणि त्यांचा उद्‌गम कोणता ? असा प्रश्न उपस्थित केला गेला तर हे स्पष्ट

होते की, ती मानव-मस्तिष्काची उपज आहे आणि मनुष्य स्वत: निसर्गाची उपज असून ज्याचा विकास आपल्याच वातावरणात व त्याच्याबरोबर झाला आहे. यावरुन असे स्पष्ट होते की, मानव-मस्तिष्काची उपज ही निसर्गाचीच उपज असल्याकारणाने उर्वरित निसर्गाचा विरोध करीत नाही, अन्यथा त्याच्याबरोबर त्याचे साम्य आहे.'' *(कार्ल मार्क्सचे संक्षिप्त चरित्र)*

जीवनाच्या भौतिक दृष्टिकोनामुळे जीवन-उद्देश देखील आपोआप भौतिकच निश्चित होते म्हणूनच फ्राइड (Fride) आपल्या दर्शनामध्ये भौतिक स्तराच्या वर जाऊ शकला नाही. तो जीवनाची व्याख्या सेक्स (स्त्री-पुरुष जातीतील संबंध) शी करतो. याउलट मार्क्सने एक वेगळीच भौतिक व्याख्या केली आहे. त्याच्यादृष्टिने मानवाचा संपूर्ण इतिहास केवळ आर्थिक संघर्षाची कहानी आहे. त्याच्या दृष्टीने सभ्यता, मानव-संस्कृती आणि नैतिकता आदि सर्व बाह्य स्तर आहेत. मूळ वस्तू अर्थ आहे. परंतु हकिकत अशी आहे की, आर्थिक दृष्टिकोन असो वा कामसंबंधी दृष्टिकोन. दोन्ही मानव-जीवनाच्या दिखाऊ अध्ययनाचा परिणाम आहे. काम प्रवृत्ती आणि अर्थमुळे किंवा कोणत्याही भौतिक विचारधारेमुळे मानव कर्म आणि क्रियेची संपूर्ण व्याख्या होत नाही. मानव कर्मांच्या मागे काम करणाऱ्या अत्यंत अवघड व गुंतागुंतीच्या मूळ प्रेरक-वस्तू आहेत; रसायन शास्त्राच्या नियमांवर आधारित त्यांचे विश्लेषण करता येणे शक्य नाही. मानव-क्रिया व कर्मांच्या बाबतीत त्यांच्या मागे काम करणारी प्रेरक वस्तू वास्तविकपणे मनुष्याची काम-वासना आहे किंवा यासारखी एखादी दुसरी तुच्छ भावना असे म्हणणे सर्वात मोठा मूर्खपणा आहे. मनुष्याचे केवळ शरीरच गुंतागुंतीचे नसून त्यापेक्षा कितीतरी जास्त गुंतागुंत त्याच्या भावना व त्याच्या जाणीवेत आढळते. मॅक्स प्लानिक ने (Max Planic) किती योग्य म्हटले आहे की :

''हकिकत अशी आहे की, कोणतीही व्यक्ती कितीही बुद्धिमान असली तरी आपल्या चेतन क्रियांच्या निर्णायक, मूळ प्रेरक वस्तूंच्या बाबतीत कार्यकारण नियमाद्वारे कधीही योग्य निर्णयाप्रत पोहोचू शकत नाही. यासाठी दुसऱ्या एखाद्या नियमाची आवश्यकता आहे. अर्थात नैतिक नियमाची''. (The Universal in the Light of Modern Physics)

जीवनातील समस्यांना भौतिक समस्या समजणे फारच चुकीचे आहे. "जीवन व मनुष्याचे व्यक्तिमत्व (Personality) आढळणे या वास्तविकतेचे प्रमाण आहे की, सृष्टिची केवळ भौतिक, व्याख्या अशक्य आहे." विज्ञानाच्या अनुभवांवरुन हेच सिद्ध होते की, सृष्टिची भौतिक व्याख्या योग्य नाही आणि अध्यात्मिकतेची कल्पना एखादा आत्मविश्वास नसून आत्म्याची दुनिया स्वतः भौतिक जगताचा पाया आहे. मोठमोठे भौतिक दृष्टिकोन मांडणारे लोक या पद्धतीने विचार करण्यास विवश झाले आहेत. पंडित नेहरुंनी लिहिले आहे :

"मोठ्या प्रमाणात ताणला गेलेला प्रत्येक विचार आपणास काहीशा मर्यादेपर्यंत अभौतिक विचारधारांकडे नेतो असे मला वाटते. आजच्या युगात विज्ञान देखील भाररहित वस्तू मिळतात त्या ठिकाणाच्या जवळपास पोहोचला आहे. मी त्या अभौतिक पैलूंवर चर्चा करु इच्छित नाही. परंतु हा युक्तिवाद ही गोष्ट स्पष्ट करतो की, बुद्धी या भौतिक जगताच्या पृष्ठावरील मौलिक वस्तूच्या शोधात आहे. जर आपण जीवनाच्या या व्यापक कल्पनेवर विश्वास केला तर त्यामुळे कदाचित आपण वंश, जात-पात अथवा वर्गांच्या बंधनापासून मुक्ती मिळवू शकतो आणि जीवनातील समस्यांच्या बाबतीत अधिक उदारता व व्यापकता निर्माण करु."

*(मार्कसिझमच्या बाबतीत पं. नेहरुंचे विचार, पृ. १४)*

भौतिकवाद्यांच्या दृष्टिकोनातून मनुष्य हा एक पशु असल्याकारणाने त्यांनी मानव-कर्मांच्या प्रेरक वस्तूचा शोध केवळ पाशविक स्वरुपात केला आहे. जर आपण भौतिकवाद्यांचे मनोवैज्ञानिक विश्लेषण मान्य केले तर त्याचा अर्थ असा होईल की जगाने सदैव चांगल्या दृष्टीने पाहिले आहे आणि नेहमीच ज्यांची कदर केली जात आहे असे सत्य, न्याय व सज्जनता यासारखे मापदंड देखील वास्तविकपणे अत्यंत तुच्छ व अल्पमोली ठरतात.

ज्याला आपण आध्यात्मिक दृष्टिकोन म्हणतो तो जीवनाचा दुसरा दृष्टिकोन आहे. या विचारधारेच्या दृष्टीने जीवनाची वास्तविकता

आणि त्याचा उद्देश भौतिक नसून नैतिक व अध्यात्मिक आहे. मनुष्य आपल्या मूळ रुपात आत्माच आहे. मनुष्याचे भौतिक जीवन त्याच्या आध्यात्मिक जीवनाचे प्रदर्शन आहे. सूक्ष्म स्वरुपात त्याचे जीवन चराचरामध्ये अनुप्रमाणित होत असलेल्या आत्म्याची क्रिया आहे. मनुष्य केवळ मांस व कातडीचा सांगाडा नसून आपले एक आत्मिक अस्तित्व देखील आहे. मनुष्याच्या व्यक्तिमत्वाचा वास्तविक संबंध त्याच्या आत्मिक अस्तित्वाशीच आहे. मनुष्याचे आत्मिक अस्तित्वच आपल्या पूर्णसपणे प्रदर्शनाकरिता विविध रीतींचा अवलंब करते. मानव-सभ्यता आणि त्याच्या विकासात त्याचेच प्रदर्शन होते.

जर मानवाने विवेकबुद्धीचा वापर केला तर त्याला मान्य करावे लागेल की, आपल्या अंत:करणात एखादी अशी गोष्ट आहे जी शारीरिक परिवर्तनानंतरही आपल्या ठिकाणी अपरिवर्तनीय व निरंतर आढळते. जर ही गोष्ट Prof. J. S. Haldane, "The Philosophical Basis of Biology." शीन, मार्क्स, एंजेल्स आणि इतर भौतिकवाद्यांच्या मतानुसार शरीराच्या नैसर्गिक क्रियांचाच परिणाम असता तर शरीराबरोबर तीदेखील बदलली असती. यावरुन असे लक्षात येते की, ती गोष्ट (जिला 'मी' किंवा 'अहं' देखील म्हटले जाते) मानव-शरीर अथवा मस्तिष्काची उपज असू शकत नाही.

मानव-समस्यांमध्ये महत्वाची समस्या अशी की - वास्तविकता (Reality) च्या बाबतीत मनुष्याचा दृष्टिकोन कोणता ? म्हणूनच वास्तविकतेच्या प्रति आपल्या दृष्टिकोनाने आपल्या नैतिक जीवनावर प्रभाव टाकू नये किंवा नैतिकतेच्या बाबतीत असलेल्या आपल्या दृष्टिकोनाने वास्तविकतेशी संबंधित असलेल्या आपल्या कल्पनेला प्रभावित करु नये हे कदापि शक्य नाही.

या विचारांतर्गत प्रा. व्हाईट हेड यांनी लिहिले आहे.

''अनैसर्गिकपणासंबंधीचे आपले ज्ञान, क्षीण, अत्यल्प व अपूर्ण आहे. यापासून अनेक त्रुटी निर्माण होतात. अनैसर्गिकपणाच्या प्रति ज्ञान व

चेतना हेच मानवी विचाराचे पथप्रदर्शन आहे आणि जीवनोद्देशाकरिता औचित्याचे कारण बनतात. अनैसर्गिक व अलौकिक धारणांशिवाय कोणतीही सभ्यता बाकी राहू शकत नाही.'' (Adventure of Ideas, P. 164)

मनुष्य जीवनात कोणती तरी विचारधारा अथवा दृष्टिकोन अवलंबण्यास विवश आहे. मंतव्य आणि दृष्टिकोन यांचा संबंध मनुष्याच्या कल्पना आणि त्याच्या विचारांशी असतो. मनुष्याचे कल्पनेसंबंधीचे जग खरे तर भौतिक नाही. अशाप्रकारे मनुष्य दुनियेत अभौतिक स्थान ग्रहण करण्यास स्वभावत: विवश आहे. हे या गोष्टीचे उघड प्रमाणे आहे की वास्तविकता केवळ भौतिक जगतापर्यंतच मर्यादित नसून ती अलौकिक जगतापर्यंत विस्तृत आहे.

मनुष्य आपल्या अस्तित्वाची आणि तो रहात असलेल्या दुनियेची कोणती ना कोणती व्याख्या करण्यास तो या जगात विवश आहे, मग ती व्याख्या भौतिकवादी नियमांवरच आधारित का असेना. व्याख्या (Interpretation) ज्या गोष्टीचे नाव आहे ती भौतिक कदापि नाही, कारण कोणत्याही गोष्टीचा अर्थ लावणे अथवा व्याख्या करणे म्हणजे त्या गोष्टीच्या आंतरिकतेच्या प्रति विचार प्रगट करणे किंवा तिच्या वास्तविकतेवर प्रकाश टाकणे, तिच्या मागे कार्यरत असलेले ध्येय वा उद्देश निर्धारित करणे होय. भौतिकवादाचा अर्थ असा होतो की, हे जग व त्यामध्ये आढळणाऱ्या वस्तूंचे कसलेही ध्येय वा उद्देश नाही, हे जीवन साररहित आहे, ही दुनिया कोणत्याही योजने अंतर्गत अस्तित्वात आलेली नाही.

मनुष्य जीवनातील अभौतिक समस्यांपासून मुक्ती मिळवू शकत नाही. मेसन याने आपले विचार प्रकट करताना लिहिले आहे -- ''आपण मनुष्याच्या अंतर्गत संबंधांच्या उपयोगिता आणि महत्वाच्या दृष्टिने (अर्थात भौतिक व नैसर्गिक दृष्टीने) व्याख्या देखील का करु नये परंतु त्याचे जे संबंध आपल्या अस्तित्वाशी व व्यक्तिमत्वाशी आहेत, ते निश्चितपणे अभौतिक आणि आत्मिक जगताशी संपर्क ठेवतात. याच वळणावर मनुष्य आपल्या लौकिक हितांना आपल्या व्यक्तिमत्वाच्या सर्वोच्च वास्तविकतेवर समर्पण करतो.''

**ए. ई. मंडेर (A.E. Mander) लिहितो** "जेव्हा आपण एखाद्या निरीक्षणाचे वर्णन करतो तेव्हा नेहमीच एकमात्र ऐंद्रिक निरीक्षणा (Observation) पेक्षा आमचा अभिप्राय काहीसा अधिक असतो. तात्पर्य असे की, ऐंद्रिक निरीक्षण आणि त्याचबरोबर ओळख (Recognition) सुद्धा होते. ज्यात व्याख्ये (Interpreation) चा अंश देखील समाविष्ट असतो."

(Clearer Thinking, London, 1949, P.46)

आमच्यापैकी प्रत्येक व्यक्ती, मग ती कोणत्याही विचारसरणीची असो, आपल्या प्रत्येक सांसारिक कार्यात कोणता ना कोणता आंतरिक दृष्टिकोन बाळगत असते. आणि आपल्या प्रत्येक निरीक्षणाची काही ना काही व्याख्या करीत असते. याव्यतिरिक्त कदाचित मनुष्य आपल्या जीवनातील एक क्षणदेखील व्यतीत करु शकत नाही. परंतु हीच गोष्ट जेव्हा त्याच्यासमोर अशा प्रकारे मांडली जाते की, त्याने आपल्या जीवनाच्या आत्मिक, नैतिक व भौतिक पैलूंसाठी एक नियमित व्यवस्था ग्रहण करावी तेव्हा तो यास एक अद्‌भूत गोष्ट समजून दूर पळून जातो. त्याने आपल्या जीवनाच्या मजबूत पायावर एक सुव्यवस्थित जीवन बनावे. याव्यतिरिक्त त्याच्याकडून इतर कोणत्याही गोष्टीची मागणी केली जात नाही हे मात्र खरे!

मनुष्याचे शरीर व त्याच्या शारीरिक गरजा या गोष्टी त्याला उत्तमप्रकारे घडवित नाहीत. मनुष्याला मन, बुद्धी आणि आत्मादेखील असते. हेच मन व बुद्धी त्यास खऱ्या अर्थाने मनुष्य बनवितात आणि पशुंपासुन वेगळे करतात. मनुष्य जोपर्यंत आपल्या मानसिक व आत्मिक आवश्यकतांची पूर्तता करील आणि आपल्या बौद्धिक व आत्मिक शक्तींचा उद्‌धार करील तोपर्यंत तो मनुष्य असतो. मनुष्याचे मन-मस्तिष्कच सर्वात जास्त महत्वाचे व मौल्यवान आहे. म्हणून त्याच मूल्यांना व मान्यतांना (Values) मौल्यवान व महत्वपूर्ण समजले जाईल. ज्यांच्या प्राप्तीमुळे आमच्या आत्म्यास व आमच्या मस्तिष्कास सुख व शांती मिळेल. ज्या सभ्यता व संस्कृतीची आधारशिला मनुष्याची पाशविक प्रवृत्ती असेल त्याचे मूल्य व महत्व काय असू शकते ? जेव्हा आपल्याला जीवनाच्या आध्यात्मिक व वास्तविक

मूल्यांचे ज्ञान असेल तेव्हाच एखाद्या सुदृढ व महान सभ्यतेला अस्तित्व असेल. आपला समाज व आपण जीवनाच्या वास्तविक लक्ष्याशी परिचितच नव्हे तर त्याच्या प्राप्तीसाठी प्रयत्नशील देखील असायला हवे. आध्यात्मिकतेशिवाय जीवनात भावुकतेचा संबंध व मानसिक संतुलन शक्य नाही आणि आमच्या विचारांमध्ये सखोलपणा सुद्धा निर्माण होऊ शकत नाही. आपल्या जीवनात आंतरिकता व वास्तविकता आध्यात्मिकतेमुळेच आढळू शकते. पण अट अशी की, ती मर्यादित अर्थातील आध्यात्मिकता नसावी, त्याचबरोबर खऱ्या अर्थाने ती मानव जीवनाची सूचक सिद्ध व्हायला हवी. केवळ दृढ निष्ठेलाच जीवनाच्या पूर्णत्वासाठी न समजता कर्म व कर्तव्यांद्वारे नवीन जीवनाची निर्मिती देखील करते तीच खरी आध्यात्मिकता असू शकते खरी आध्यात्मिकता मनुष्याला संकीर्णता व जीवनाच्या आखुड कक्षेच्या बाहेर काढून विचार व चिंतनाच्या एका विस्तृत दुनियेत आणून उभा करते - एक अशी दुनिया जिथे मनुष्याला जीवनातील अमर्याद संभावना आढळतात, जिथे विचार व चिंतनाची संकीर्णता नष्ट झालेली असते, जिथे जीवनाच्या केवळ बाह्यस्वरुपाचा रसिक असलेल्या व्यक्तीला ज्या रहस्यांची उच्चता व व्यापकतेचा अनुमान लावणे शक्य नाही. अशी जीवनातील रहस्ये मनुष्यावर स्पष्ट होतात.

मानवाने त्याग करावा आणि स्वत:ला देश, जाती वा मानवजातीच्या हितार्थ झोकून देणे या गोष्टी शक्य आहेत. परंतु त्याचे जीवन स्वतः अपूर्ण आहे. त्याच्याकडून परिवार, देश व मानव समाजाच्या पूर्णत्वाची कोणती अपेक्षा केली जाऊ शकते ?

मेसनच्या शब्दांत -- "जेव्हा वस्तूंच्या उपयोगिता व लाभदायकतेसंबंधी मूल्य आणि त्याच्या आध्यात्मिक मूल्यांमध्ये अनुकूलता निर्माण केली जाईल तेव्हाच आपल्या व्यक्तिमत्वाची निर्मिती शक्य आहे. या दोन्ही पैलूंमध्ये कशा प्रकारे सामंजस्य निर्माण करता येईल हे अजून मनुष्य शिकला नाही. मग जोपर्यंत भौतिकता व आध्यात्मिकता दोन्ही एकमेकांना आपला सहायक समजत नाहीत. तोपर्यंत मानव-जीवनाची मंद-सृष्टि स्वच्छ होणार नाही."

इस्लामची सर्वात मोठी अविस्मरणीय कामगिरी अशी की, त्याने उपभोग्य वस्तुंचे मूल्य आणि आध्यात्मिक मूल्यांमध्ये अनुकूलता निर्माण केली, ज्यामुळे पदार्थ आणि आत्मा यात कसलेही वैर उरले नाही. त्याने आत्मा व शरीर यामध्ये एकात्मता निर्माण केली. इस्लाम आपल्या चेतनेला निर्मळ व शांतीमय बनवितो. आपले जीवन केवळ भौतिक जीवनापर्यंतच मर्यादित रहात नसून आपल्याला शाश्वत जीवनाचा संदेश मिळू लागतो. आता मनुष्याची दशा अनाथ मुलासारखी रहात नसून त्याला या गोष्टीचे ज्ञान प्राप्त होते की त्याचा कोणीतरी स्वामी व मालक आहे, एख़ादी चेतन सत्ता (Intelligent Being) जिने केवळ आम्हालाच निर्माण केले नसून त्याच्याकडून आपल्या आत्मिक आवश्यकतांची तृप्ती सुद्धा होते अशी ही सत्ताच आपल्या जीवनाचे अंतिम लक्ष्य आहे. ज्याची प्रतिष्ठा आपल्या आत्म्यापेक्षा उच्च असेल तेच आपल्या आत्म्याचे लक्ष्य असू शकते. आपल्यापेक्षा तुच्छ वस्तूला जीवन-लक्ष्य बनविले जाऊ शकत नाही. आपल्या आत्म्याचे अंतिम लक्ष्य परमात्मा (ईश्वर) च असू शकते. परमात्म्यामध्ये विराम प्राप्त केल्यानंतरच आपले हृदय स्थायी आनंद मिळवू शकते. त्याचेच स्मरण जीवनाचे अस्पर्श सौंदर्य आहे. जीवनाचे हे रहस्य प्राप्त केल्यानंतर मनुष्य अमर होतो. त्याच्या मनाचा एकांतपणा दूर होतो आणि त्याच्या आत्म्यास सुख, विलास, पावित्र्य व सगळीकडे एखाद्याच्या अस्पर्श सौंदर्याचा चमत्कार दिसू लागतो असे शांतीमय वातावरण प्राप्त होते. हे ते सत्य आहे जे आपल्या जीवनाला सरल बनविते आणि त्यास माधुर्य प्रदान करते.

प्रेम, अनुराग, मित्रता, गोड वाणी, दयेचे कार्य हे सर्व आध्यात्मिकतेची देन आहेत. या सर्वांच्या मागे अदृश्य स्वार्थ काम करीत नसेल तर ते जीवन एखादा सुरभित करणारा जीवन-पुष्पाचा सुगंध आहे. जीवनात जोपर्यंत सरलता येत नाही, जोपर्यंत आपण जीवनाचा सुगम व सोपा मार्ग प्राप्त करीत नाही, तोपर्यंत आपले जीवन या गुणांपासून वंचित राहील. आपल्या जीवनात जर हे गुण नसतील तर आपण मोठ्यात मोठे कार्य केले, मोठ्यात मोठे सांसारिक लाभ प्राप्त केले तरी आपल्या जीवनात कधीही नष्ट न होणारी शून्यता कायमची आढळून येईल. मनाच्या रिक्त स्थानास खेळ तमाशे व मन प्रसन्न करणाऱ्या कार्यांनी भरले जाऊ शकत नाही.

सुखी जीवन साधे असते, परंतु ते उच्च विचारांनी संपन्न असते. एका इंग्रजाने सत्य लिहिले आहे की, ''जो इतरांना बौद्धिक खुराक देतो, स्वतःचा विचार करा, अशी प्रेरणा जो इतरांना देतो, जो तुम्हाला बुरसटलेल्या चिंतन-मार्गांच्या आणि असामाजिक पातळीच्या दलदलीतून मुक्त करतो, ज्याला तुम्ही कधी प्रेम करता कधी घृणा परंतु ज्याला तुम्ही कधीही विसरु शकत नाही तो मोठा मनुष्य आहे.''

*(Elbert Hubard, W. Virg Med Journal, Feb. 1960)*

वास्तविकपणे प्रसन्नता, सुख व शांती जीवनात खऱ्या अर्थाने उपयोगात आहेत. या उपयोगाव्यतिरिक्त कोणत्याही आनंदाची कल्पना केली जाऊ शकत नाही. सुख व चैन जीवनोद्देशाच्या व्यावहारिक पूर्ततेपासूनच मिळत असते. खरोखरची प्रसन्नता कुठे खरेदी केली जात नाही, खरोखरच्या प्रसन्नतेची एक स्थिती असते. त्या स्थितीपर्यंत पोहोचणे आध्यात्माशिवाय शक्य नाही. जीवनास आध्यात्माने ओत-प्रोत करणे जीवन-प्राप्तीपेक्षा जास्त आवश्यक आहे. जीवन आध्यात्माने भरलेले असेल तर दररोजच्या सामान्य व्यवहारांमध्ये देखील मनुष्यास आनंद मिळू लागतो. मानवी जीवनात आध्यात्मिकतेस मोठे महत्व आहे. इतकेच नव्हे तर आध्यात्मिकतेविना मनुष्य स्वार्थी, स्वच्छंद आणि स्वेच्छाधारी बनतो आणि तो सेवा-भार उचलण्यात असमर्थ ठरतो. ज्यासाठी ईश्वराने त्याला या जगात पाठविले आहे. त्याचबरोबर तो खरोखरचा आनंद आणि सुखी जीवनापासून देखील कायमचा वंचित राहतो. निसर्गाच्या ज्या वास्तविक नियमांनुसार आपली निर्मिती झाली आहे त्याच दिव्य नियमांचा अवलंब करुन आपण सुख व शांती प्राप्त करु शकतो.

# आशा

एखाद्या सुंदर व पूर्ण वस्तूला तुम्ही जी संज्ञा द्याल ती त्यास शोभून दिसेल, मात्र जी वस्तु कुरुप व अपूर्ण असेल तिला लहानात लहान चांगले नाव देणे देखील शोभनीय नसते. धर्माच्या बाबतीत जेव्हा मी विचार करतो, ज्याकडे सर्व प्रेषितांनी व महापुरुषांनी आमंत्रित केले आहे, तेव्हा माझ्या आश्चर्याला सीमा उरत नाही. त्याची व्याख्या (Interpretation) कोणत्या शब्दांत केली जावी हेच समजत नाही. उत्तमोत्तम संज्ञा आपण त्याला देण्याचा निश्चय करतो तोच त्याला अनुकूल ठरतो. मनाचे समाधान होत नाही. मोठ्यात मोठ्या शुभ व सुंदर संज्ञेमुळे धर्माच्या संपूर्ण भावनांचा परिचय होत नसतो आणि मनाच्या समस्त भावनादेखील त्याच्या माध्यमातून व्यक्त होत नाहीत.

धर्माच्या विभिन्न संज्ञांमध्ये त्याची एक संज्ञा 'आशा' ही देखील असू शकते. मन आणि मस्तिष्कात वाढणाऱ्या निराशेच्या अंधःकारास धर्मापेक्षा वरचढ आशेच्या किरणांद्वारे हटविणारी दुसरी कोणतीही वस्तु असू शकत नाही.

धर्म मानवास कोणत्याही स्थितीत निराश होऊ देऊ इच्छित नाही. आपण मानवजीवन आणि धरती व आकाश याबाबत विचार करा. वर्तमान ब्रह्मांडात केवळ भौतिक आणि नैसर्गिक नियमच (Laws of Nature) कार्यशील नसून येथे नैतिक नियम (Moral Laws) देखील कार्यान्वित असल्याचे स्पष्टपणे आढळून येते. नवजात शिशुला संगोपनाबपरोबरच लाडाची देखील आवश्यकता असते, त्यास दुधासह प्रेम व स्नेहदेखील हवे. प्रेम व स्नेहाचा संबंध नैतिकतेशी (Morality) आहे. बाळाला प्रेम आई-वडील आणि बहीण-भावाच्या रुपात प्राप्त होते आणि

१. विषय दृष्टीला आपले ध्येय बनविणाऱ्यांना पश्चिमेत Epicureans म्हटले जाते, भारतात त्यांना वाममार्गाचे अनुयायी समजले जाते.

पूर्णतः मिळते. जीवन आणि मानव अस्तित्व येथे ज्या व्यापक नियमांतर्गत शक्य झाले आहे त्यामागे महान चेतना कार्य करीत आहे. आपल्या विविध प्रकारच्या आवश्यकतांच्या पूर्ततेमध्ये एखाद्या महान व्यक्तिमत्वाचे आणि करुणामय ईश्वराच्या दयाळूपणाचे दर्शन घडते. दयाळूपणा आणि अनुग्रहाचा थेट संबंध नैतिक नियमांशी असतो. नैतिकते (Morality) चा वापर येथे मी व्यापक अर्थाने करीत आहे. चेतन वस्तूच्या स्वभावाला नैतिकतेची संज्ञा देणे अत्यंत उचित ठरेल.

धर्मात जर नैतिक भावनांवर अधिक भर दिला गेला असेल तर ते निराधार नाही. नैतिकता एक व्यापक आधार आहे ज्याच्या बळावर संपूर्ण ब्रह्मांड उभा आहे. नैतिकतेच्या निषेधाचा अर्थ निराशा आहे. धर्माचे दुसरे नाव आशा आहे तर अधर्म व नास्तिकता निराशा आहे. आशेऐवजी लोकांना निराशेकडे बोलाविणे भयंकर अत्याचार आहे.

मानवास हे नाशवंत जीवन मिळाले आहे. परंतु कामना त्याला अनंत जीवनाची देण्यात आली आहे. मानव निरंतर अशा वसंताचे स्वप्न पाहात असतो. येथे धर्मच मानवाचा आधार बनतो. तो मानवास आशा दाखवितो की त्याला कधीही समाप्त न होणारे जीवन अवश्य मिळेल. त्याला तो वसंत प्राप्त होईल. सृष्टीच्या रहस्यांना जाणून घेण्यास तो अभिलाषी असेल तर ती वेळ अवश्य येणार आहे जेव्हा रहस्यांवर पडलेले आवरण हटेल. मानव ईश्वराचे साक्षात दर्शन करु शकेल; त्याच्या सर्व कामना पूर्ण होतील. धर्मात परलोकाच्या धारणेचा मानवाच्या स्वाभाविक अभिलाषांशी आणि सुखद मनोवेगांशी घनिष्ट संबंध आहे.

---

१. तृष्णार्तिप्रभवं दु:खं

२. कोणी किती सत्य म्हटले आहे ""Man is not merely a thinking creature, but a feeling creature and a striving creature."

मानवास आपल्या चुकांवर पश्चाताप होतो. त्याच्या चुका माफ केल्या जाव्यात आणि तो विनाशापासून वाचावा असे त्याला वाटते. धर्म येथे देखील त्याला निराश होऊ देत नाही. ईश्वराच्या दयाळूपणापासून निराश होऊ नकोस असे तो म्हणतो. जर तुम्ही जीवनात योग्य नीतीचा अवलंब करीत असाल तर ईश्वर तुम्हाला आपल्या दयाळूपणाच्या छत्रछायेत अवश्य घेईल. तुम्हाला येणाऱ्या शाश्वत जीवनात निराश व्हावे लागणार नाही. तुम्हाला ईश्वराचे सामीप्य प्राप्त होईल. तुम्हाला आत्म्याचे प्रयोजन पूर्ण होईल. ज्या ईश्वराने मानव जातीला पथभ्रष्टतेच्या अंध:कारात भटकण्यासाठी सोडले नाही, ज्याने मार्गदर्शनाची व्यवस्था केली, त्यासाठी प्रेषितांना व ईशदूतांना पाठविले, आपले ग्रंथ अवतरित केले, सत्य व असत्याचे ज्ञान प्रदान केले, तो मानवास निराश कसा करु शकतो ? मानव स्वत: आशेऐवजी आपल्या मनात निराशेला स्थान देत असेल तर ती गोष्ट वेगळी. आणि जीवनात अशा नीतीचा अवलंब करावा ज्याचा परिणाम विनाशाव्यतिरिक्त काहीही असू शकत नाही. अशा स्थितीत आपल्या विनाशाला जबाबदार मानव स्वत: असेल.

# अध्यात्म

जीवनाच्या बाबतीत विविध प्रकारच्या विचारधारा आढळतात. काही लोकांनी भोग-विलासालाच आपले ध्येय बनविले आहे. त्यांच्या दृष्टिने इंद्रियजन्य सुखोपभोगच जीवन आहे. खा प्या आणि मजा करा[१]. या व्यतिरिक्त त्यांना काहीच माहीत नाही, जेव्हा मृत्यु येईल तेव्हा आम्ही असणार नाही. जोपर्यंत आम्ही जिवंत आहोत तोपर्यंत मरण नाही, म्हणून मृत्यूचे भय व्यर्थ आहे.

जीवनाच्या बाबतीत दुसऱ्यां विचार धारेला 'इंद्रियातील मानसिक तप' असे नाव दिले जाऊ शकते. या विचारधारेच्या अनुयायींच्या दृष्टीने संसार मिथ्यास्वरुप आहे, यामुळे सर्वथा विरक्त राहणे अनिवार्य आहे. इंद्रियजन्य सुख बंधनरूपी आहे. त्यांच्या मतानुसार आसक्ती व तहानेमुळेच सर्व दुःखे निर्माण होतात.[१] सुख काही स्वतंत्र सत्ता नाही, सुख केवळ दुःखाच्या अभावाचे नाव आहे. जीवनाची प्राप्ती केवळ जगापासून वेगळा होऊन फक्त स्वतःमध्येच मस्त राहणे हेच त्याच्या दृष्टीने आध्यात्मिकतेचे एकमात्र साधन आहे.

जीवनाच्या बाबतीत तिसरी विचारधारा आणि अध्यात्मासंबंधीची सर्वोच्च कल्पना ती आहे ज्यास इस्लाम आपल्यासमोर ठेवतो. इस्लाम जीवनाचा जो आराखडा सादर करतो, तो केवळ मनुष्याच्या आत्म्यासंबंधीच्या समस्यांपर्यंत मर्यादित नसून त्याची कक्षा मनुष्याचे शरीर आणि भौतिक जगतापर्यंत व्याप्त आहे. मनुष्यामध्ये आपणास तीन प्रकारच्या शक्ती आढळतात. एक विचार करण्याची शक्ती, दुसरी अनुभवण्याची शक्ती आणि तिसरी क्रियाशीलता.[२] इस्लामी दृष्टिकोनातून याच तिन्ही शक्तींच्या सुव्यवस्थेचे नाव मानव-जीवन आहे.

अध्यात्मिकतेच्या अइस्लामी कल्पनेमध्ये सर्वाधिक भरभराटीस आलेली ती अशी विचारधारा ज्या अंतर्गत ही भावना कार्यरत आहे की शरीर

आणि आत्मा यांच्या अपेक्षा एकमेंकाच्या भिन्नच नव्हे तर एकमेकांविरुध्द आहेत. दोन्हींची एकाच वेळी वाढ होणे शक्य नाही. लौकिक जीवन आणि सांसारिक कार्य आत्म्यासाठी दलदलीसमान आहेत. ज्यात अडकून आत्मा उद्धार करू शकत नाही. केवळ दुःख भोगू शकतो. या दृष्टिकोनाचा परिणाम असा होतो की, अधिकांश लोक अध्यात्मिकतेपासून निराश झाले आणि जगामध्ये स्वच्छंद व स्वेच्छाचारी बनून मानव-समाजाच्या पतनास कारणीभूत ठरले. याउलट अध्यात्मिकतेचे प्रेमीजन आणि धार्मिक विचार बाळगणाऱ्या लोकांनी संसार व संसारातील सर्व वस्तूंपासून अलिप्त राहून वनांचा व पर्वतांचा मार्ग धरला. संसारापासून तुटून ते आपल्या ज्ञान-ध्यानाला लागले. अतिशय कठीण तपाद्वारे आपल्या शरीरास जर्जर बनविण्याच्या कार्यास त्यांनी आपला उद्देश बनविला. जगाला जगवासी आणि स्वार्थी लोकांच्या हाती सोपविले, परिणामस्वरुप दुनियादारीचा अवलंब करणारे नैतिक, अध्यात्मिक प्रत्येक दृष्टीकोनातून नीचतेच्या खड्ड्यात पडत गेले. त्यांचे सामाजिक जीवन त्यांची सभ्यता आणि त्यांची संस्कृती त्यांचे राजकारण, त्यांचे अर्थकारण सर्वकाही नैतिकता व अध्यात्मिकतेपासून वंचित बनून राहिले.

दोन्ही वर्गांचा जीवनोद्देश एकमेकांच्या भिन्न बनला. एका वर्गाने सांसारिक सुखसोयींनी संपन्न होणे आपल्या जीवनाचे अंतिम लक्ष्य मानले आणि दुसरा वर्ग अध्यात्मिक अइस्लामी कल्पनेमुळे अशा भ्रमात पडला की, मनुष्य काही अलौकिक शक्तींचा मालक बनावा. हा तथाकथित अध्यात्मिकता प्राप्तीचा सार आहे. आणि ते लोकांना आश्चर्यचकित करणारे अद्भुत कार्य दाखवू लागले.

इस्लामी दृष्टिकोन यापेक्षा पूर्णतः भिन्न आहे. इस्लामच्या मते, शरीर व आत्मा यांच्या दरम्यान कोणतेही वैर नाही. हे संसार मिथ्यारूप कदापि नाही. सुख, शारीरिक प्रवृत्तींच्या विरोधात नसून शरीर व आत्म्याच्या सुंदर सामंजस्यात आहे. आनंद व सफलता संसार त्याग व

शरीराला निर्बळ करण्यात नसून जीवनाच्या सदुपयोगात आहे. मानव आत्म्यास ईश्वराने आपला मुखत्यार आणि प्रतिनिधी बनवून पाठविले आहे. त्याला काही अधिकार देण्यात आले आहेत आणि काही जबाबदाऱ्या टाकण्यात आल्या आहेत. त्या जबाबदाऱ्या पार पाडण्याकरिता त्याला एक उचित व उत्तम शरीर प्रदान करण्यात आले आहे. मनुष्याने ईश्वराच्या इच्छेनुसार त्यापासून काम घेणे हे त्याचे कर्तव्य आहे. मनुष्याने ईश्वराच्या इच्छेनुसार आपल्या शारीरिक शक्तींचा उपयोग करणे हाच त्याच्या अध्यात्मिक प्रगतीचा एकमेव मार्ग आहे. हे विश्व मनुष्याकरिता परीक्षेचे स्थान आहे. येथे त्याला जीवनाच्या प्रत्येक विभागात, मग ते राजकारण असो वा समाजकारण, जीवनाचा आर्थिक पैलू असो वा नैतिक, त्याला जीवनाशी संबंधित प्रत्येक क्षेत्रात आपली योग्यता, कार्यशीलता आणि सत्यनिष्ठेचा परिचय करून द्यायचा आहे.

इस्लामच्या दृष्टीने जीवन संन्यासाची कल्पना पूर्णतः चुकीची आहे. ख्रिश्चनांनी हा मार्ग स्वतःच अवलंबिला होता. (जीवनसंन्यास हा त्यांचा बुध्दीशोध आहे) त्यांना ईश्वराकडून त्यासाठी कोणताही आदेश मिळाला नव्हता. मानवी प्रकृतीच्या प्रतिकूल असलेल्या गोष्टीचा आदेश ईश्वर कसा देऊ शकतो? इस्लामच्या दृष्टिकोनातून ईश्वराशी नाते जोडणे हेच खऱ्या अर्थाने मनुष्यासाठी अध्यात्मिक विकास (आत्मिक उद्धार) आहे.

ईश्वराचे सामीत्य अशा प्रकारे प्राप्त होते की, मनुष्याने स्वतःला स्वतंत्र समजू नये. तो ईश्वराचा दास आहे. ईश्वराने त्याला आपला मुखत्यार बनवून पाठविले आहे. त्याने पृथ्वीवर ईश्वराच्या इच्छेनुसार जीवन व्यतीत करावे. जी सेवा कार्ये ईश्वराने त्याला सोपविली आहेत ती पूर्ण करावीत. त्याने आपली योग्यता व शक्ती ईश प्रसन्नता प्राप्त करण्यात वापरावी. मनुष्याबरोबर त्याची वागणूक अशी असावी जी ईश्वराला पसंत आहे.

मनुष्य आपल्या कर्तव्यपालनात जितका सुस्त व गाफिल असेल, तितका जास्त तो ईश्वराचा अवज्ञाकारी समजला जाईल आणि जितका

जास्त वेळ तो अशा प्रकारे नष्ट करीला तितका तो ईश्वरापासून दूर होत जाईल, हीच त्याच्यासाठी अध्यात्मिक अवनति आहे.

जीवन ईश्वराच्या दास्यत्वाच्या जाणीवेसह व्यतीत होईल, जीवनात मनुष्य आपल्या ईश्वराला विसरला नाही, ईश-प्रेम व ईशपरायणतासह मनुष्याचे हृदय ईश्वराकडे सदैव झुकलेले असेल तर तो जगामध्ये मनमानी पध्दतीने न वागता ईश्वराच्या आज्ञेनुसार वागेल. आपल्या प्रत्येक कार्यात ईश्वराची प्रसन्नता पाहील, स्वतःला ईश्वरासमोर जबाबदार समजून त्याच्या आज्ञेनुसार सर्व कार्य करीत राहील. मग ते कार्य सामान्य दृष्टीने सांसारिक कार्य समजले जात असावेत जसे दररोज कमविणे, मुला-बाळांचे पालन पोषण, मानव सेवेचे कार्य, देशाचा प्रबंध इ. तरच त्याचे जीवन अध्यात्मिकतेने परिपूर्ण समज़ले जाईल.

इस्लाम अध्यात्मिक विकासासाठी एखादी अशी योजना सादर करीत नाही की ज्यामुळे मनुष्य जगापासून वेगळा होईल. जंगलात व पर्वतांमध्ये जाऊन वेगवेगळ्या प्रकारच्या तपस्यांनी आपले शरीर विरघळविणे आणि त्यातच आपला अध्यात्मिक विकास अनुभवणे इस्लाम अशी जीवनव्यवस्था निर्धारित करीत नाही. ज्यात मानव आपल्या जीवनाचा मौल्यवान वेळ घालवून वृध्दावस्थेत पोहोचला असेल अथवा वृध्दावस्थेत पोहोचण्याच्या निकट असेल तेव्हा मानव जीवन विविध आश्रमांमध्ये अशा प्रकारे विभागले जावे की मनुष्याला अध्यात्मिक पूर्णत्व प्राप्त करण्याचा संधी मिळावा. याउलट इस्लाम अध्यात्मिक शिक्षणाची व दीक्षेची संधी सर्वांसाठी सुरुवातीपासूनच प्रदान करतो. आपण इस्लामी सिध्दांतावर लक्ष दिले तर आपल्या जीवनाचे प्रत्येक कार्य अध्यात्मिक प्रशिक्षणाचे साधन सिध्द होते.

इस्लाम अध्यात्मिकतेचा मानव प्रकृतिच्या अनुकूल आराखडा सादर करतो ज्यात कोणत्याही प्रकारची त्रुटि आढळत नाही. नमाज आपल्या अध्यात्मिक विकासाचे प्रथम साधन आहे ज्याचे लहानांपासून मोठ्यांपर्यंत सर्व सरलतेने पालन करू शकतात. नमाज आपल्या हृदयामध्ये ईश्वराचे फक्त भयच

निर्माण करीत नसून आपल्या मनात त्याच्या प्रति प्रेम भावनेचे जागरण देखील करते. आपल्या हृदयात त्याची स्मृती जागृत करते, ईश्वराच्या आदेशांना वारंवार पुढे आणते. नमाज समुदायासह अदा करण्याचा आदेश दिला गेला आहे जेणेकरून मनुष्याने केवळ वैयक्तिक स्वरुपातच नव्हे तर सामुहिक स्वरुपात आपल्या संपूर्ण समाजासह अध्यात्मिक विकासाकडे वाटचाल करावी. मनुष्य आपला वैयक्तिक मान ठेवतो यात शंका नाही. परंतु त्याला समाजापासून अलिप्त सुध्दा केले जाऊ शकत नाही.

रोजा (उपवास) आपल्या अत:करणात ईश-शक्ती ची जाणीव उत्पन्न करतो. आपणास जकात (एक प्रकारचे दान) अदा करण्याचा आदेश देखील देण्यात आला आहे. ईश-प्रेमापोटी जे धन आपण खर्च करू आणि त्याद्वारे आपल्या बांधवांचे सहाय्य करू त्यामुळे आपल्या आत्म्यांचा विकास होईल आणि आपले आचरण शुध्द बनेल. अरबी भाषेत 'जकात' चा अर्थ - 'शुध्द होणे आणि वाढणे' असा आहे. जकातला जकात यासाठी म्हणतात कारण त्याद्वारे ते धन ज्याची जकात दिली जाते आणि त्याच्या बरोबर मनुष्याचे हृदय स्वच्छ होते आणि धन-संपत्तीत भरभराट व वृध्दी होते, यामुळे ईश-भक्तीच्या भावनेस बळ प्राप्त होते. जी व्यक्ती ईश्वराने दिलेल्या धन संपत्तीतील ईश्वराच्या दासांचा हक (हिस्सा) बाजूला काढत नाही त्याचे धन देखील अपवित्र बनते आणि त्याचे मन सुध्दा.

हज (मक्केची पवित्र यात्रा) द्वारा ईश्वराच्या थोरवीचा विचार आणि त्याचे प्रेम स्थायी स्वरुपात आपल्या मनात बसते. अशा प्रकारे इस्लाम ईशभक्तीच्या आधारावर एक सार्वभौम आंदोलन राबवितो आणि विश्वव्यापी बंधुत्वाची निर्मिती करतो ज्याद्वारे सार्वभौम आणि आंतरराष्ट्रीय स्तरावर नैतिकता व अध्यात्मिकतेला प्रसिध्दी मिळते.

इस्लाममध्ये अध्यात्मिकतेची मानव प्रकृतिला प्रतिकूल कल्पना आढळत नाही. आणि मनुष्याला असे स्वातंत्र्य देण्यात आलेले नाही की ज्यामुळे तो केवळ आपल्या इच्छा व वासनांचा दास बनावा आणि आपल्या

आत्म्याच्या शांतीसाठी त्याला काहीही करता येऊ नये. त्याचे संपूर्ण जीवन आपल्या सांसारिक इच्छांच्या पूर्ततेमध्येच समाप्त व्हावे आणि ईश्वराची प्रसन्नता प्राप्त करण्यासाठी कसलेही पाऊल त्याला उचलता येऊ नये. ईश्वराने त्याच्यावर सोपविलेल्या जबाबदाऱ्या त्याला पूर्ण करता येऊ नयेत.

इस्लामच्या दृष्टीने अध्यात्मिकतेचा अर्थ या व्यतिरिक्त काहीही नाही की, मनुष्याने आपल्या ईश्वराला ओळखावे आणि त्यांच्याशी आपले नाते जोडावे. ईश्वरच त्याचे सर्वकाही आहे. हे चांगल्या प्रकारे ओळखावे स्वतःला त्याच्या मर्जीच्या हवाली करावे, त्याने निषिध्द केलेल्या प्रत्येक कामापासून स्वतःला रोखावे आणि ईश्वराने आज्ञा दिली असेल ते काम करण्यासाठी पूर्ण कर्तव्य परायणतेसह तत्पर राहावे. एक दिवस आपणास ईश्वरासमक्ष आपल्या मन, वचन आणि कर्माचा हिशोब द्यायचा आहे याचे भान ठेवून त्याची आवड आपली आवड बनावी आणि त्याची नापसंत आपली ना पसंत व्हावी इतका दृढ संबंध ईश्वराशी प्रस्थापित करावा. ईश्वराच्या इच्छेपुढे त्याची स्वतःची कसलीही इच्छा नसावी. ज्या दुर्गूणांना तो पाहू इच्छित नाही त्यांना मूळासकट नष्ट करण्यासाठी आपल्या संपूर्ण शक्तीचा वापर करावा आणि ज्या सद्गुणांनी तो जगाला सुशोभित पाहू इच्छितो, मानवाने त्या द्वारे फक्त आपल्या वैयक्तिक जीवनालाच सुशोभित करू नये तर जगामध्ये त्यांचा प्रसार करण्याचा प्रयत्न करावा. अध्यात्मिक विकासाचे ध्येय ज्या प्रकारे एक व्यक्ती निश्चित करू शकते त्याच प्रकारे एक संस्था, एक जाती आणि संपूर्ण मानव समाज देखील ते ध्येय गाठून अध्यात्मिकतेच्या अंतिम शिखरापर्यंत पोहोचू शकतो.

खरे तर इस्लामने अध्यात्मिकतेचे जे चित्र सादर केले आहे त्यात आपल्याला आपल्या सर्व शक्तींचा आणि आपल्या सर्व योग्यतांचा अवलंब करण्याची संधी मिळते, आपल्या भेडसावणाऱ्या सर्व समस्यांचे निराकरण होते, त्याचबरोबर वास्तविकपणे त्यामुळे आपल्या तहानलेल्या आत्म्याला शांती देखील प्राप्त होते.

# ईश्वराचे स्वरुप

ईश्वराविना मानवी जीवन अर्थहीन असते. जेव्हा मानव ईश्वराचे ज्ञान प्राप्त करील आणि ईश्वर त्याच्या नित्य जीवनात सहभागी होईल तेव्हाच त्याच्या सुखद भावनांचा अर्थ लक्षात येतो.

मानव जगामध्ये स्वत:ला अशा स्थितीत पाहतो जिथे त्याला आपण अपूर्ण असल्याचा आभास होतो. त्याला एखाद्या अशा वस्तूचे अभीष्ट आहे जिला बरोबर घेऊन तो स्वत:ला पूर्ण बनवू शकेल. जिला बरोबर घेतल्याने मानवी जीवन पूर्ण होते अशी वस्तू कोणती ? याच्या निर्णयाबाबत मतभेद असले तरी मानव आकांक्षा, कामना आणि काही अपेक्षाची तृष्णा आहे हे कुणीही नाकारू शकत नाही. आपल्या लौकिक व भौतिक गरजा पूर्ण व्हाव्यात इतकेच त्याला अभिष्ट नसून तो त्याच्याही पुढचा विचार करतो. तो जीवन व जगाचा अंतिम उद्देश व रहस्य (Ultimate secret and ultimate aim and object) जाणून घेऊ इच्छितो. दुसऱ्या शब्दात तो ईश्वराला जाणून घेऊ इच्छितो. त्याला भेटून आपल्या सर्व इच्छा पूर्ण व्हाव्यात. भलेही तो ईश्वराचे नाव घेत नसला तरी जीवनामध्ये त्याला ईश्वराचाच शोध घ्यावयाचा आहे.

ईश्वरापासून जीवन वंचित राहणे म्हणजे मानव स्वत: मध्येच कुठेतरी अडकून पडला आहे. याच्या परिणामस्वरुप मानवी मन व मस्तिष्काला अभीष्ट आहार मिळत नाही. त्यामुळे त्याच्या मन व मस्तिष्काचा विकास होत नाही. इतकेच नव्हे तर मानवी मनाची अवस्था त्या पक्ष्यासमान होते जो आपल्या राहण्याच्या जागेकडे जाणारा मार्ग विसरतो आणि घरटे शोधण्यासाठी इकडेतिकडे सैरावैरा फिरत राहातो.

ईश्वर मिळाल्यानंतर मानवास आपल्या मोठेपणाचा अनुभव होतो आणि त्यातच त्याच्या व्याकूळ आत्म्यास व त्याच्या विव्हल प्रेमास शांती मिळते. मानवात त्या जीवनाची अभिलाषा आहे तिचा प्रादुर्भाव त्या संबंधीच्या अभिव्यक्तीपासून होतो. ईश्वर व आपल्या दरम्यान मधुर संबंध स्थापित करण्यासाठी त्याचा आत्मा व्याकुळ झालेला दिसून येतो. मानवीय मधुर भावना स्वभावत: एका अशा प्रभुची कल्पना साकार करते ज्याचे शुभचरण आपल्या हृदयाकमलावर स्थिरावले आहेत. मानवाचे स्वाभाविक

सुखद मनोवेग आणि भावना मौल्यवान आहेत. या भावना या गोष्टीला साक्षी आहेत की मानव सर्वसामान्य प्राणी नाही. मानव आपल्या स्वाभाविक प्रवृत्तींना व भावनांना पूर्ण न करता स्वतःलाच आघात पोहचविणे हे त्याच्यासाठी कदापि उचित नाही. वर उल्लेखित जगाचा अंतिम उद्देश

---

१. येथे कुणाला या गोष्टींचा धोका होऊ नये की, सृष्टा व सृष्टींमध्ये कोणताही फरक नाही. सृष्टीतील कोणत्याही वस्तूला ईश्वर समजणे पथ-भ्रष्टता आहे. वास्तविक अस्तित्व वास्तवात ईश्वराचे आहे. सृष्टी कल्पना स्थिती (Imaginary Form) मध्ये असते. जेव्हा आपण कल्पना शक्तीद्वारे आपल्या मनात एखादी इमारत, व्यक्ती इत्यादीचे चित्र बनवितो, तेव्हा आपण त्याचे सृष्टा व रचयिता बनतो आणि आपण त्यास आपली रचना म्हणू शकतो. आपण रचलेली वस्तू स्वतःच्या अस्तित्वासाठी निरंतर आपल्यावर अवलंबून राहते. आपण कोणत्याही क्षणी वाटल्यास तिच्यावरील आपले लक्ष हटवून तिला नष्ट करू शकतो. आपली रचना स्वतःचे अस्तित्व गुण इत्यादींबाबत आपल्यावर अवलंबून असते. आपण व आपल्या रचने दरम्यान दृढ संपर्क व संबंध असतो. त्यांच्याद्वारे आपले ज्ञान, संकल्प व शक्तीचे प्रदर्शन होते, परंतु तरीही आपण व आपल्या रचनेमध्ये फरक असतो. दोन्हींना एक म्हटले जाऊ शकत नाही. अगदी याचप्रमाणे ईश्वर आणि त्याच्या सृष्टीला एक समजणे योग्य नाही. दोघांत फरक करावा लागेल. होय ज्या प्रमाणे आपली रचना आपल्या अस्तित्वाची साक्षी असते त्याप्रमाणे ही सृष्टी देखील ईश्वराच्या अस्तित्वाची ग्वाही देते. ईश्वराला एका पैलूनुसार बीजरूप म्हटले जाऊ शकते, इतकेच नव्हे तर विज्ञानाने आज आपल्याला अशा ठिकाणी आणून सोडले आहे जिथे महान वैज्ञानिक हे मान्य करण्यास विवश झाले आहेत की, विश्वामध्ये जे काही दृष्टीस पडते. मुळात ती वस्तू (Thing) नसून केवळ कर्म (Action) आहे अथवा घटनांचे (Events) घर. ब्रट्रेण्ड रसेलच्या दृष्टीकोनातून पदार्थ एक साधे सुत्र (Formula) जे घटनेच्या बाबतीत सांगता यावे की ती कशाप्रकारे घडली, खरे तर पदार्थाचे मूळ अस्तित्वच नसते, यासाठी बनविण्यात आले आहे. ऑसपेन्स्कीच्या (Ouspensky) शब्दात केवळ एक स्थिती (Condition) आहे. अगदी त्याप्रमाणे जसे अंधत्व (Blindress) कसलाही पदार्थ नसून एक स्थिती (Condition) आहे. जेम्स जेंजने तर या गोष्टीची घोषणा केली आहे की,

वास्तविकपणे एक अजर, अमर, शुभ, मंगल, सुंदर प्रभु आहे. जीवन, चेतना व मधुर भावनांचा एकमेव श्रोत तोच आहे. जीवनातील सर्व प्रयोजने त्याला भेटल्यानंतरच पूर्ण होतात. त्याची अनुभूति जीवनाची सार्थकता आहे. त्याचे ज्ञान जीवनाचा प्रकाश आहे. त्याची प्रतीती हृदयाची गती आणि मनाचे पावित्र्य आहे. जीवनाचे संतुलन, भावनांचे माधुर्य आणि सौंदर्याचे कारण तोच आहे. जग आणि जीवनाची कडी त्यालाच जाऊन भिडते. जीवनमूल्ये आणि मान्यतांचा मूलाधार तोच आहे. तो आनंद रूप आहे. त्याच्याच छायेत जीवन आहे. त्याच्याच छायेत अमृत आहे. त्याला न ओळखणे महाविनाश आहे. आपल्या सर्व घडामोडी त्याच्याच दिशेने व्हायला हव्यात. मानव प्रवृत्तीची दिशा त्याच्याच बाजूला आहे, ग्रह-ताऱ्यांकडे नाही.

जीवनांच्या दृढ व मधुर सत्यापासून अनभिज्ञ राहून आपण कसे पवित्र बनून राहू शकतो. परम सत्याची उपेक्षा करून कोणी कसे सुखी राहु शकतो ?

ज्याची जिज्ञासा आमच्या हृदयाचा एकमेव आधार आहे त्याच्याकडे परत फिरा. ज्याच्यामुळे मनाच्या भावनांचे स्त्रोत न मिळाल्यामुळे

---

ब्रह्मांड एक महान रचयिता बुध्दी (Mind) अथवा चेतनाची रचनाच नसून वास्तविकपणे ते चेतन व बुध्दीच्या कल्पना (conceptions) व विचारांचे (thoughts) नाव आहे. आता या धारणेची स्वीकृती मिळाली आहे की चित्त (Mind) व चेतनेच्या बाहेर कोणत्याही वस्तूचे अस्तित्वच नाही. कोणतीही वस्तू बाह्य जगतात आढळण्याचा अर्थ ती अमानसिक (Non-Mental) आहे असा होत नाही. प्रत्येक वस्तूची मानसिकता अशी असते की ती विचार व मनोभावना आहे. बाह्य जगतात जे काही आहे, ज्याचा अनुभव समान स्वरूपात सर्वांना होतो की एक व्यापक महान व अमर चेतने (Umversal mind or Eternal Spirity) च्या मनात अस्तित्वात आहे अथवा तिच्या बरोबर कायम (Subsist) आहे.

1. "Beauty is the shining of the idea through matter. Only the soul and what pertains to it is truly beautiful and therefore, the beauty of nature is only reflection of natural beauty of the spirit."

कोरडे बनतात आणि जीवनाला नीरस बनवितात, त्याच्याकडे परतून या. मानवा तू कुठे भटकत आहेस ! तुझ्या चालण्यासाठी पवित्र भूमी अनादि काळापासून निर्माण करण्यात आली आहे. पावित्र्याचा त्याग करून तू आपल्या संपूर्ण वातावरणाला अपवित्र बनवशील? कोण म्हणतो तू आपले पंख मिटवून घे. तू स्वतः शक्ती आहे. उडण्याची इच्छा पूर्ण कर, परंतु ज्या आकाशात तुझी इच्छा पूर्ण होऊ शकते त्याची उपेक्षा का करतोस. सत्य तुझ्या स्वातंत्र्यावर प्रतिबंध लावत नाही. ज्या व्यतिरिक्त स्वतंत्र्याला कसलाही अर्थ रहात नाही अशा स्थितीत तो तुला आणू इच्छितो.

मानवाला ईश्वराशी संबंध जोडायचा नाही. हा संबंध आदिकालीन आहे आणि चिर:कालापर्यंत निरंतर राहणार आहे. याच संबंधाच्या फलस्वरुप मानवाला अस्तित्व मिळाले आहे. याच संबंधामुळे त्याचे रुप प्रकट झाले आहे. हा संबंध त्याच्या अस्तित्वाचे मूलतत्व (Main element) आहे. हा संबंध स्थापित करावयाचा नसून केवळ त्याचे ज्ञान प्राप्त करावयाचे आहे. केवळ त्यास आपल्या अनुभवात आणायचे आहे. मानवा ! तू त्याचेच प्रतिरूप आहेस. लाटांमध्ये सागर कुशी बदलत आहे. किरणांमध्ये सूर्याचा प्रकाश आहे.[१] हे मानवा! तू परम माधुर्याची आभा आहेस. तू स्वतःचा गुणग्राहक का बनत नाहीस ? तुला कशाचा भ्रम वाटतो ? तुझ्या मार्गात कोण वाटमारी करीत आहे ? तू कुलीन नाहीस म्हणून कोण सैतान तुला भ्रमात अडकविण्याची कुचेष्टा करीत नसलेल्या जगताचा तू निवासी आहेस, असे कोण म्हणतो ? तुझ्या हृदयाचा स्वभाव आणि तुझी चेतना शक्ती भौतिक पदार्थाची उपज आहे आणि कोणत्याही दिव्य ज्योतीचे त्यात वास्तव्य नाही, असे कोण तुला पटवून देत आहे ? जे तुला अनाथ म्हणतात ते तुझे हितचिंतक होऊ शकत नाहीत. ते तुला तुझ्या संरक्षक, मित्र आणि नित्य सहचरापासून अलिप्त ठेवू इच्छितात. तू निराशेच्या अंधःकारातून कधीही बाहेर निघू नयेस, तुझ्या मनोकामना कधीही पूर्ण होऊ नयेत, तू तहानलेलाच राहावा आणि तहानलेलाच मरावा, अशी त्यांची इच्छा आहे. असे लोक तुझे वैरी आहेत. सर्व आनंदाचे मूळ कारण असलेला तुझ्या आत्म्याचा दिव्य विवाह संपन्न व्हावा अशी त्यांची इच्छा नाही. ते तुझ्या चेहऱ्याच्या सुंदरतेला हिसकावून घेऊ इच्छितात. तुला त्यांच्या कपटनीतीचे ज्ञान होत नाही. हे मानवा ! तुझ्या

मुखाकृतीच्या सौंदर्याचे मुख्य कारण रक्त आभाच नसून आणखी एक परम आभा आहे. तिने अपवित्र नेत्रांपासून सुरक्षित राहण्यासाठी रक्त आभाच्या आवरणाचा आधार घेतला आहे. तुला याचे ज्ञान व्हायला हवे.

आत्मारुपी पक्ष्याचा पंख तोच आहे. पंख पक्ष्यासाठी शक्तीच नव्हे तर सौंदर्य बनून त्याच्या अस्तित्वात समाविष्ट होतात. पंख पक्ष्यासाठी कसलाही अनिष्ट भार नसतात. त्याचे पंख कापले जावेत आणि तो सौंदर्यहीन बनावा अशीं कुणाची इच्छा होईल? परंतु अज्ञानाचे वाईट व्हावे. मानव केवळ स्वत:वर आघात पोहोचविण्यास आतुर असल्याचाच दिसत नसून आत्मिक दृष्टीने तो आत्महत्येसाठी देखील दृढ करीत असतो.

मानव एकाग्रचित होऊ इच्छितो ही त्याची भावना अत्यंत महत्वाची आहे. त्याला एक हृदय मिळाले आहे ते एकाच अभीष्टाची अपेक्षा करते. त्याचे प्रेम विखुरले जावे अशी त्याची इच्छा नाही. प्रेमाला स्वाभाविकपणे एकाग्रता हीव आहे. प्रेम एकाग्रतेचीच चरमस्थिती आहे. माधुर्य हृदयाचे एक अतिकोमल तत्व आहे. याचेच साकार रूप म्हणजे सौदर्य होय सौंदर्य वास्तविकपणे सर्वथा भावना असते. तिचे निवास स्थान मनाचे पवित्र ठिकाण असते. सुंदर वस्तुंच्या माध्यमाने आपण आपल्या मधुर भावनांचा अवलोकन करीत असतो. म्हणूनच त्या वस्तू आपल्याला सुंदर वाटतात. हेगेलने किती सत्य म्हटले आहे,

"पदार्थांद्वारा येणारा सौंदर्य हा उज्वल भाव आहे. केवळ आत्मा आणि जे त्याच्याशी संबंधित आहे तीच वास्तविक सुंदरता आहे, अशा प्रकारे निसर्गाचे सौंदर्य आत्म्यांच्या स्वाभाविक सौंदर्याचे परावर्तन आहे."[१]

वर ज्या तथ्याकडे निर्देश करण्यात आला आहे त्यावरून ही गोष्ट स्पष्टपणे सिध्द होते की, जगामध्ये ज्या ज्या ठिकाणी आणि ज्या रुपात मनासाठी एखादे आकर्षण, सौंदर्य व माधुर्य आढळते ते आपल्या स्वत:च्या हृदयाच्या विस्तारा व्यतिरिक्त दुसरे काहीही असत नाही. अर्थात त्या सर्व भाव व माधुर्यामुळे आपला आत्मा पूर्वी पासूनच परिपूर्ण व संपन्न असतो. ज्यांचे निरीक्षण व अवलोकन तो जगात करतो. जगातील सर्व वस्तु माधुर्य व आकर्षणाचा स्त्रोत सौंदर्य व पावित्र्य आदि संज्ञा ज्यांना दिली जाते असे सर्व काही आपल्या चेतनेमध्ये निहित करून ठेवले आहे ती परम सत्ता आहे.

तो एक सत्ता अमृत रूपात प्रत्येक दिशेत प्रवाहित आहे. एक नाद आहे जो विभिन्न रेडिओ सेटवर ऐकला जात आहे. सौंदर्यरूपी नादाचे प्रसारण केंद्र एकच आहे. ज्याला हे रहस्य ज्ञात होत नाही त्याची एकाग्रता या प्रसंगी विखुरली जाते. परंतु जे ज्ञानवान आहेत ते कोणत्या तरी एका रेडिओ सेटवर गाणे ऐकूण सर्व रेडिओ सेट्सवरील गाणे ऐकल्याचा संतोष मिळवितात. कोणत्याही स्थितीत त्यांच्या एकाग्रतेचे सूत्र तुटत नाही. त्यांचा संबंध एका व्यतिरिक्त अन्य कोणाशी होऊ नये, ही त्यांची स्वाभाविक कामना पूर्ण होते. त्यांना माहीत असते आणि व्यावहारिक स्वरुपात जाणतात की, एका अभीष्टा व्यतिरिक्त दुसऱ्या कोणत्याही अभीष्टाचे अस्तित्वच नाही. त्या एकाव्यतिरिक्त जे काही आहे तो त्याचा चमत्कार आहे.जर एकाच गायकाचे अनेक गीत आपल्याला ऐकविले गेले तर ते कदाचित भिन्न गीत असतील. परंतु त्यांचे मुळ एकच असेल जे समान रुपात सर्वांमध्ये समाविष्ट असते ज्यामुळे गीतांची एकता टिकून राहाते. आपण प्रत्येक गीत एकाच गायकांच्या आवाजात ऐकत असू. त्या मूळ तत्वामुळे अशा गीतांच्या एकतेमध्ये फरक पडत नाही. ती गायकाच्या आनंदाची अखंडता असते, जिला तो आपल्या गीतांच्या माध्यमाने व्यक्त करू इच्छितो आणि त्याच्या स्वत:च्या स्वरामध्ये त्याचेच व्यक्तिमत्व साकारते. अशा गीतांमागे एकच व्यक्तिमत्व कार्यशील असते. विभिन्न गीतांच्या माध्यामातून व्यक्त होणारा एकच आनंद असतो. अगदी याचप्रमाणे विश्वातील समस्त मधुर अभिव्यक्तींमध्ये पवित्र नेत्र सामान्यत: सर्वांमध्ये प्रति बिंबित होणारे मूलतत्व प्राप्त करतात आणि ग्रहण करतात. अशा प्रकारे सर्व वस्तूंना एकतेच्या बंधनात बांधून ठेवणारे सूत्र आपल्याला सापडते. मग कोणतीही वस्तू परकी रहात नाही. सर्वांमध्ये घनिष्ट संबंध स्थापित होतो. याचा एक मोठा लाभ असा होतो की, ईर्षा, लोलुपता, द्वेष इ. अनैतिक भावनांचा अंत होतो. मनुष्य सर्वांचा आदर करण्यास शिकतो. त्याचे हृदय अत्यंत विशाल बनते. अशा प्रकारे अत्यंत संतुलित व पवित्र दिसणाऱ्या समाजाची निर्मिती होते.

आता फक्त असा प्रश्न मागे राहतो की, त्या परम सत्तेच्या अस्तित्वाच्या बाबतीत आपली कल्पना काय असावी ? तिच्याबरोबर चेतना, व्यक्तिमत्व आणि सौंदर्यांचा बोध कसा शक्य असेल ? संक्षिप्तमध्ये यावर विचार विमर्श करण्याची आवश्यकता आहे.

ईश्वर आहे, याचा इन्कार बुध्दी आणि विवेक नसलेली व्यक्तीच करू शकते. हे संपूर्ण ब्रह्मांड आणि स्वतः मानवाचे अस्तित्व ईश-सत्तेचे साक्षी आहे. ईश्वराला मान्य केल्याविना ब्रह्मांड व मानवाचे कोणतेही कारण निर्धारित केले जाऊ शकत नाही. ईश्वराला मान्य न करता ब्रह्मांडाची कसलीही व्याख्या (Interpretation) केली जाऊ शकत नाही. या ब्रह्मांडाचे विधान व व्यवस्था एक अपार ज्ञान (Wisdom) आणि एखाद्या महान चेतना शक्तीचे परिचायक आहे. ब्रह्मांडाची व्यवस्था अत्यंत वैज्ञानिक (Scientific) पध्दतीने चालत आहे. ही व्यवस्था व विधान अत्यंत गूढ गुणतज्ञता व उद्देशावर आधारित आहे. एका कणाच्या सूक्ष्म अध्ययनापासून ते सौर मंडल (Solar System) आदिंच्या सामान्य अध्ययनाने देखील त्याचा अनुमान लावला जाऊ शकतो. ज्याप्रकारे ''आपल्या हातात एक विशिष्ट प्रकारचा जोड आणि मांस - पेशींचे संयोजन असल्यामुळे तो वाकतो.'' हे सत्य आहे अगदी त्याचप्रकारे ''हा जोड याकरिता आहे की आपला हात वाकावा.'' हे देखील एक सत्य आहे आणि त्याच पातळीचे सत्य आहे. ही या करिता ची गोष्ट हात बनविण्यामध्ये एखादी चेतना आणि एखादी बुध्दी (Mind) व एखादी इच्छा कार्यरत असल्याचे सत्य सिध्द करते. ही चेतना, इच्छा व सामर्थ्य एका महान व्याक्तिमत्वाची कल्पना देते ज्यात या संकल्प, इच्छा, चेतना आदिचे आरोपण शक्य आहे. लक्षण सदैव त्याचा आधार बनू शकणाऱ्या अस्तित्वाची अपेक्षा करते. आपण लक्षणाचे निरीक्षण स्पष्टपणे करीत आहोत आणि यात आपल्याला कसलाही धोका होत नसेल तर त्याच्या मूल स्त्रोताचा स्वीकार करणे आपल्याला अनिवार्य ठरते. अन्यथा आपली दशा त्या व्यक्तीसारखी होईल जी पावसामुळे भिजत आहे परंतु आकाशात ढग आहेत हे मानायला तयार नाही. अशा व्यक्तीला हटवादी म्हटले जाईल अथवा त्याची बुध्दी भ्रष्ट झाली आहे असे समजले जाईल.

आता प्रश्न केवळ त्याच्या स्वरुपाच्या कल्पनेचा उरतो. तो आमच्या अनुभवात कसा येईल आणि त्याचे स्वरुप व व्यक्तिमत्वाविषयी आपली धारणा काय असेल ? हा एक गुढ प्रश्न आहे. तरीही वाचकांच्या समाधानासाठी याबाबत काही संकेत द्यायला हवेत. प्रत्येक वस्तूची

अभिव्यक्ती त्याची लक्षण आणि गुणांमुळे होत असते हे आपणास ठाऊक आहे. जर एखादी वस्तु गुणरहित व लक्षणहीन असेल तर त्याची अभिव्यक्ती व प्रचिती अशक्य होईल. जलाचे प्रत्यक्षकिरण त्याचे लक्षण तरलता व शीतलता इत्यादीव्दारा असते. अशा प्रकारे आपल्या दृष्टी-शक्तीचे प्रदर्शन विविध वस्तुचे पाहणे आणि त्यांचे प्रत्यक्ष अस्तित्वामुळे होते. प्रत्येक वस्तूचे रंग-रुप आपल्या दृष्टी-शक्तीमध्ये बुडून आपल्यासाठी प्रकट होते. जर तिच्या रुपाचा लय आपल्या दृष्टी-शक्तीमध्ये अथवा चेतनशक्ती मध्ये झाला नाही तर आपण तिला कदापि पाहू शकत नाही. त्याचबरोबर आपल्याला हे देखील माहीत आहे की, एखाद्या वस्तूला दर्शवून तिच्या माध्यमातून आपली दृष्टीशक्ती स्वत:ला देखील दर्शवित असते. वस्तूंच्या प्रदर्शनामध्ये प्रकाशाचे प्रदर्शन सर्वप्रथम होत असते. प्रकाशाकडे आपले लक्ष न जाणे आणि वस्तूंकडे पाहते वेळी प्रकाशाची अनुभूति आपल्याला न झाल्यास, ती गोष्ट वेगळी. खरे तर वस्तूंच्या प्रकटीकरणामध्ये सर्वप्रथम आपल्याला प्रकाशाचा अनुभव होतो आणि त्याच्याच माध्यमातून वस्तु आपल्याला दिसू लागतात. अशा प्रकारे लीलामय (Performanceful) दिसू लागतो परंतु त्याचबरोबर तो लीलातीत (Performanceless) देखील होतो. त्याच्या मौलिक रुपात कसलाही विकार उत्पन्न होत नाही. पूर्णते (Perfection) च्या स्थितीत वस्तूंचे हेच वैशिष्टय असते. हीच अवस्था त्या परम सत्तेची आहे की प्रत्येक वस्तूला आपल्या अंध:कारहीन तेजस्वीतेद्वारे दर्शवून ती स्वत: विकृत बनत नाही. ज्याप्रमाणे वीण्याच्या तारांमध्ये अगणित राग आणि समुद्रात अनंत लाटांची संभावना असते, कवीच्या मनात अपार काव्य प्रेरणा स्थिरावलेल्या असतात, त्याप्रमाणे त्या अपार सत्तेमध्ये संपूर्ण जग विश्राम करीत असते, तरी देखील तिच्या ज्योतीमध्ये कोणताही फरक आणि परिवर्तन होत नाही. *(Change and Variation)*

**"कुल्ल यौमिन हुआ फ़ी शान"** **- कुरआन ५५:२९**

**अर्थात** - "नवनवीन वैभवांत अथवा कार्यात तो (लक्षित) असतो."

वर म्हटल्याप्रमाणे प्रत्येक वस्तूचे प्रकटीकरण त्याच्या गुण आणि लक्षणांद्वारे होते. त्याच्या लक्षणांद्वारे आपणास त्यांच्या अस्तित्वाचा आभास होतो. जर पाण्याचा आभास आपल्याला तरलता, शीतलता आदि लक्षणांद्वारे होतो तर आपल्या आत्म्याचा आभास आपणास इच्छा, संकल्प, भावना, चेतना आदि त्यांच्या लक्षण व गुणांद्वारे होतो. जलाच्या ज्या अतिशय जवळच्या स्वरुप (Appearance and Likeness) व स्वभावापर्यंत आपण पोहोचू शकतो ती तरलता, शीतलता इत्यादी वैशिष्टये आहेत. अशा प्रकारे आत्म्याच्या ज्या अतिशय जवळच्या स्वरुप व स्वभावापर्यंत आपण पोहोचू शकतो ती शक्ती, सामर्थ्य संकल्प, चेतना, ज्ञान, मनोभाव इत्यादी त्याची लक्षणे व गुण आहेत. जगाच्या क्रियाकलापामध्ये जिथे ईश्वराच्या संकल्प, ज्ञान, सामर्थ्य, चेतना आदिंचा आभास होतो तर त्याच ठिकाणी स्वतः मानवाच्या अस्तित्वामध्ये देखील या सर्वांची अनुभूति होत असते. इतकेच नव्हे तर आपल्या आत्म्यामध्ये त्याची चेतना, शक्ती, ज्ञान इत्यादी गुण व लक्षणे प्रत्यक्षपणे प्रतिबिंबित होऊ लागले आहेत. चिमण्यांचा चिवचिवाट आणि त्यांच्या मधुर गीताने आपल्याला चिमण्यांचा परिचय होतो, अगदी याच पध्दतीने मन आणि जगतात चेतना, शक्ती, ज्ञान, सौंदर्य, मनोभाव इत्यादी आढळणारी लक्षणे आपणास परम सत्तेचा अनुभव देतात. ज्या प्रमाणे आपल्याला हवेच्या झोतामुळे हवेची प्रचिती येते त्याचप्रमाणे या लक्षणामुळे आपल्याला त्या सत्तेची प्रचिती होते. आपले व्यक्तिमत्व एखाद्या महान व्यक्तिमत्वाचा परिचायक आहे.

आपल्या चेतनेचा स्त्रोत भौतिक शरीर असू शकत नाही. ज्ञान व चेतनारहित भौतिक पदार्थ, चेतना व भावनांचा स्त्रोत कसा असू शकतो ? त्यासाठी आत्म्याचे अस्तित्व मान्य करावे लागते. आपले शरीर केवळ त्या रेडिओ संचासमान आहे ज्यांच्या सहाय्याने आपण विविध गीते, भाषण, बातम्या आदि ऐकत राहतो. हे गीत, बातम्या इत्यादींचा स्त्रोत रेडिओ संचच आहे असे मानणारी व्यक्ती अत्यंत मूर्ख असेल. आपले शरीर आणि मस्तिष्क केवळ रेडिओ संचाचे कार्य करते. यांच्याद्वारे ज्या चेतना, भाव आदिंचे प्रदर्शन होते ती आत्म्याची वैशिष्टये आहेत. ज्याप्रमाणे रेडिओ संच नादुरुस्त झाल्यामुळे आपण बातम्या व्यवस्थित ऐकू शकत नाही त्याप्रमाणे मस्तिष्क

मध्ये विकार वा उपद्रव झाल्यामुळे आत्माच्या गुणांचे प्रदर्शन योग्य प्रकारे न झाल्यामुळे मनुष्य वेडा व विक्षिप्त होऊन आपले संतुलन हरवून बसतो.

खुद्द हा आत्मा आणि त्याचे गुण परमात्म्याची प्रतिच्छाया आहे. आत्म्याचा समस्त भाव आणि उद्‌गारांचा मुळ स्त्रोत परिपूर्ण असलेली परम सत्ताच असू शकते. आपणाला आपल्याच रहस्यांचे ज्ञान होऊ शकत नाही. हे आपल्या अपूर्णतेचे प्रत्यक्ष प्रमाण आहे. आपण स्वत: पूर्ण असतो तर आपले ज्ञान स्वत: आपल्या बाबतीत देखील मर्यादित राहणे ही गोष्ट कदापि घडली नसती. म्हणून निश्चितच आपल्या चेतनेचा स्त्रोत कुणी दुसराच आहे. साहजिकच अपूर्ण एखाद्या पूर्णच्या अधीन असतो. पूर्ण केवळ ईश्वर आहे.

वर उद्‌धृत करण्यात आले आहे की, सुंदरता, माधुर्य इत्यादींची वास्तविकता भाव व्यतिरिक्त दुसरे काहीही नाही. सुंदरता वास्तविकपणे स्वत: आपल्या आंतरिक स्वरुपात असते. ज्याप्रमाणे गोडवा आपली एक अनुभूति आहे त्याचे नाते आपण बाह्य वस्तूंशी जोडतो आणि म्हणतो की अमुक वस्तू खुप गोड आहे. अगदी त्याचप्रमाणे सुंदरता देखील आपल्या आत्म्यात असते. आपण तिचा संबंध त्या वस्तूंशी स्थापित करतो ज्यात आपल्या आत्मिक सुंदरतेचे प्रतिबिंब दिसते. इतकेच नव्हे तर आपण विचार करू लागल्यास मान्य करावे लागेल की, ज्याला आपण पाहाणे, ऐकणे, स्पर्श करणे. एखाद्या वस्तूचा भास होणे असे म्हणतो हे सर्व आंतरिक भाव आणि चेतने व्यतिरिक्त दुसरे काहीही नाही. भावच सृष्टीचे मूळ आहे. भावापासून जगताची सृष्टी बनली. भाव (Abstract Feeling) द्वारेच याचा आभास होऊ शकतो. भावचे मूळ आणि व्यापक रुप आनंद आहे. आनंदच अमृत आहे, आनंदच नित्य आहे, सर्वत्र सर्वदा आनंदासाठीच बोलले जाते. याला कधी प्रेमाची संज्ञा दिली जाते जे आनंदाचे पूर्ण रुप आहे. त्या अभिष्ट आनंदाच्या प्राप्तीसाठी आत्मास्वभावत: व्याकूळ राहतो. येथूनच आविर्भाव होतो जी आपल्या चेतनेची सूचना देते. याचा संबंध देखील आनंदाशी असतो.

जेव्हा सौंदर्य, माधुर्य आदि गुण आपल्या वास्तविक स्थितीमध्ये आत्म्याशी संबंध आहेत. आणि यापासूनच त्यांचे अस्तित्व स्वीकारले जाते. तेव्हा ईश्वराला सत्यम, शिवम व्यतिरिक्त सुंदरम मान्य करणे सत्यतेच्या प्रतिकूल कदापि असणार नाही.

आणि मग येथूनच हे माहीत होते की, ईश्वराच्या शुभ दर्शनाची संभावना कसी मानली जाते आणि त्यापासून आपल्या सौंदर्य प्रियतेला तृप्ती कशी प्राप्त होऊ शकते ? त्यामध्ये आपल्या मनाकरिता आकर्षण कसे होऊ शकते ?

आता प्रश्न केवळ असा विचारला जाऊ शकतो की, ईश्वर कुठे राहतो ? तो कोणत्या लोकचा निवासी आहे ? याबाबतीत हे समजून घ्यावयाचे आहे की ज्याप्रमाणे एखाद्या पदार्था (Matter) ला आपल्या अस्तित्वासाठी स्थानाची (Space) आवश्यकता असते. त्याप्रमाणे ईश्वराचे अस्तित्व नाही. आत्मा वा परमात्म्याची प्रतिरुपे असलेली चेतना व ज्ञान आपल्या अस्तित्वासाठी एखाद्या स्थानाची अपेक्षा करतात काय ? कदापि नाही ! काळ आणि स्थान (Time and Space) वर हे कदापि आश्रित नाहीत. काळ आणि स्थान अवास्तविक आणि अपेक्षिक (Relative) गोष्टी आहेत ज्यांचा आविर्भाव भौतिक पदार्थ (Matter) मुळे होतो. पदार्थाच्या अस्तित्वामुळे स्थानाचा आणि त्याच्या गतीमुळे काळाचा आभास होतो. ईश्वर या गोष्टींपासून सर्वथा मुक्त आहे. हे जे म्हटले जाते की, ईश्वर प्रत्येक ठिकाणी आहे, तर वास्तविकपणे तो प्रत्येक ठिकाणी आहे, परंतु ज्याप्रकारे ज्ञान निर्लिप्त असते त्याप्रमाणेच ईश्वर निर्लिप्त पवित्र्यासह आहे. त्याची पोहोच सर्व ठिकाणी आहे, परंतु पदार्थांसारखे तो स्थानाच्या सीमेमध्ये जखडलेला नसतो. कुरआनमध्ये आहे.

**जिकडे तुम्ही तोंड कराला तिथे अल्लाहचे अस्तित्व आहे.**

२ : ११५

वर जे काही सांगितले गेले आहे ते केवळ याचसाठी की अध्यात्म, ईश सत्ता आणि त्याच्या अस्तित्वाच्या बाबतीत लोकांना असे वाटू नये की, त्याचा बुध्दी आणि तर्काशी कसलाही संबंध नाही. अथवा ती ज्ञान व विवेकाविरुध्द एक निर्मूळ धारणा आहे.

ज्ञान आणि सत्य धारणा जेव्हा मानवाची अनुभूति बनून त्याच्या चेतनेत समाविष्ट होते तेव्हा त्याचे जीवन एक असा अनुभव बनते ज्यास सौंदर्य साधना आणि 'दिव्य आनंद' यासारखे पवित्र व उच्च नावच दिले जाऊ शकते.

# आत्मा आणि परमात्मा

**प्रश्न**

१) आत्मा (Soul) आणि परमात्मा (God) मध्ये काय संबंध आहे ?

२) शारीरिक कष्ट, दु:ख यातना आत्म्याला प्राप्त आहेत अथवा शरीराला ?

३) आत्मा शरीराच्या अभावात सुख-दु:ख, हर्ष-विवाद, दु:ख यातना भोगू शकतो काय ? तो शरीरात येण्यापूर्वी कुठे असतो ? आणि मृत्यूनंतर कुठे निघून जातो ?

४) सर्व मानवांमध्ये सारखेच आत्मे आहेत काय ?

५) ईश्वर, खुदा आणि ऋषि हे शब्द एकाच नियंत्याचे घोतक आहेत काय ? अगर होय, तर तिन्ही शब्दांच्या अनुयायींमध्ये फरक, वैषम्य, द्वेष का आहे ?

विश्वनाथ प्र. सिंह, मुजफ्फरपूर (बिहार)

**उत्तर -**

१) हा प्रश्न मनात अवश्य निर्माण होतो, परंतु याचे योग्य उत्तर माहित करणे अथवा याच्या उत्तरास समजून घेणे सोपे नाही. याची अनेक कारणे आहेत. आपण स्वत: आत्मा आहोत, मात्र आत्म्याचे स्वरुप जाणून घेणे आणि त्यास शब्दांमध्ये स्पष्ट करणे किती अवघड आहे. हे आपल्याला चांगल्याप्रकारे ठाऊक आहे. अनेक अज्ञानींनी आत्म्याचा पूर्णपणे इन्कार केला. ती त्यांची चूक आहे. जर ही अवस्था असेल तर आत्म्यापेक्षा श्रेष्ठ परमात्मा अर्थात ईश्वराच्या अस्तित्व व सत्तेला पूर्णत: समजणे आपल्याकरिता किती अवघड आहे, हे तुम्ही स्वत: समजू शकता. जर स्वत:ला समजून घेणे इतके अवघड असेल तर ईश्वराच्या सत्तेस पूर्णपणे जाणून घेणे किती अवघड असू शकते. अशा प्रकारे जेव्हा आत्म्याचे वास्तविक स्वरुप आणि ईश्वराला समजणे इतके कठीण असेल तर मग त्याच्या पारंपारिक संबंधाला पूर्णत: समजणे आमच्यासाठी सोपे कसे असू

शकते. कारण यापैकी कोणा एकाला समजणे एक दुसऱ्यावर अवलंबून असते. जसे ईश्वराचे अस्तित्व आणि त्याचे स्वरुप एक रहस्य आहे तसे त्याचा आत्म्यांदरम्यान आढळणारा संबंध देखील एक रहस्य आहे. ईश्वराच्या गुणांपैकी एक गुण असा देखील आहे की तो सर्वोच्च आणि रहस्यमय आहे. आपली कल्पनाशक्ती त्याची पूर्णतः कल्पना करण्यात असमर्थ आहे. ईश्वराची महानता आणि रहस्यमयते पुढे मानवास झुकणे भाग पडते.

ज्याप्रकारे ईश्वराची सत्ता आणि त्याचे व्यक्तिमत्व रहस्यमय आहे त्या प्रकारे अस्तित्वाच्या दृष्टीने आपला त्याच्याशी जो संबंध आहे, त्यास पूर्णतः समजून घेणे कठीण व अशक्य आहे. आतापर्यंत कवींनी आणि विचारवंतांनी याबाबतीत बरेचसे भाष्य केले आहे. परंतु त्यामुळे रहस्यावरून पडदा उठत नसून त्यामुळे एका मर्यादेपर्यंत आपल्या जिज्ञासेला शांती मिळते. उदाहरणार्थ मौलाना रुम यांनी म्हटले आहे.

''दूध आणि मधाचा स्वाद वास्तविकपणे अंतःकरणाचे प्रतिबिंब आहे, डोळ्याची ज्योती वास्तवात अंतःकरणाच्या ज्योतीपासून असते. मग अंतःकरणाच्या 'ज्योती' ची ज्योत वास्तवात ईश्वराच्या प्रकाशाचे प्रतिबिंब आहे, जे बुध्दी व इंद्रियापेक्षा भिन्न आहे. हे वाचा, नेत्र आणि कान आत्म्याचे प्रतिबिंब आहे. जसे पाण्याची उकळी आणि जोर अग्निचे प्रतिबिंब आहे तसे त्याचे अस्तित्व आहे.''

अशा प्रकारे या उदाहरणांद्वारे मौलाना रुम यांनी तथ्य समजण्याचा प्रयत्न केला आहे, ज्यामुळे काही अंशी संतोष अवश्य होतो तरीही रहस्य, रहस्यच राहते.

याबाबतीत एक गोष्ट लक्षात ठेवायला हवी की, ईश्वरा व्यतिरिक्त जे काही आहे त्यास त्याची रचनाच म्हटले जाईल. त्याला ईश्वर कदापि म्हटले जाणार नाही. जर एखादी व्यक्ती एखादे चित्र काढतो वा आपल्या मनात एखाद्या इमारतीची कल्पना करतो तर या दोन्ही गोष्टी त्याच्या प्रत्यक्ष व अप्रत्यक्ष रचनाच असतील. या दोन्ही गोष्टींपासून त्या व्यक्तीची कुशलता आणि गुणांचा परिचय देखील काही प्रमाणात मिळू

शकतो. परंतु ही दोन्ही चित्रे आणि काल्पनिक इमारत ती व्यक्ती होऊ शकत नाही. त्यांना केवळ त्या व्यक्तीची रचनाच म्हणू शकतो. अगदी याप्रकारे हे सारे जग आणि आपले आत्मे ईश्वराची रचना आणि त्याचा चमत्कार आहे. त्यांना ईश्वराचे पद प्राप्त होऊ शकत नाही. ईश्वर एकच एक आहे.

२) सुख दुःखाचा अनुभव करणारी गोष्ट वास्तविकपणे आत्माच आहे. हा अनुभव कधी शरीराच्या माध्यमातून होतो तर कधी प्रत्यक्ष माध्यमाशिवाय होतो. वर्तमान जीवनात सर्व साधारणपणे सुख दुःखाचा आभास शरीराच्या इंद्रियांद्वारा होतो.

३) शरीराच्या अभावामध्ये देखील आत्म्यास सुख-दुःख वा हर्ष आदिंचा आभास होऊ शकतो.

एखादे लोक आहे ज्यास आत्मलोक म्हटले जाऊ शकते. आत्मे शरीरात येण्यापूर्वी येथे निवास करतात. मृत्युनंतर 'आलमे बरज़ख' (पितृलोक) मध्ये जातात. या 'बरज़ख' पितृ लोकमध्ये दोन ठिकाणे आहेत. एकात चांगले आत्मे राहतात आणि दुसऱ्या ठिकाणी वाईट आत्मे राहतात. जेव्हा आपण आत्म्याला पूर्णपणे समजू शकत नाही तर आत्मलोक आणि 'आलमे बरज़ख' ला पूर्णतः कसे समजू शकतो. आपल्या आत्म्याच्या स्वभावाच्या अनुकूल एखादे ठिकाण असावे, एवढेच समजून घेणे पुरेसे आहे.

४) आत्मे सर्व मानवांमध्ये सारखेच असतात, परंतु विचार आणि कर्मांनि कुणी त्याला दूषित व विकृत बनविते तर कुणी त्याला विकसित बनविते. कारण कर्मांचा प्रभाव मनुष्याच्या आत्मा आणि त्याच्या विचारांवर पडत असतो.

५) लोक विविध टोळ्यांमध्ये विभक्त झाले आणि परस्पर एकमेकांचे वैरी बनले हा लोकांचा वैयक्तिक गुन्हा आहे. ईश्वर सर्व मानवांना परस्पर भावा भावासारखे पाहू इच्छितो. म्हणूनच त्याने लोकांना निरंतर सरळ मार्ग दाखविण्यासाठी आपले प्रेषित पाठविले आणि आपले ग्रंथ अवतरित केले.

# स्वातंत्र्य

रूसो (Rosscau) ने म्हटले होते. "Man is born free but everywhere he is in chains.'

**अर्थात** - ''मनुष्य स्वतंत्र जन्मास आला, परंतु तो सर्वत्र हकीगतीच्या साखळदंडात जखडलेला आढळून येतो.'' रूसोने हे राजकीय दृष्टिकोनातून म्हटले होते. परंतु त्याचे हे कथन दुसऱ्या पैलूंनी देखील शंभर टक्के खरे ठरते. मानवास वास्तविक आणि खरोखरचे स्वातंत्र्य लाभावे ही त्याची सर्वात मोठी आणि मौलिक आवश्यकता आहे, कारण त्या व्यतिरिक्त व्यक्ती, समाज, देश आणि संपूर्ण मानवता यापैकी कोणाचाही अभीष्ट विकास आणि उद्धार शक्य नाही. हे स्वातंत्र्य प्राप्त केल्याशिवाय मानवास त्या आघात आणि हानीपासून स्वत:चा बचाव करणे शक्य नाही ज्यापासून तो आज पीडित असल्याचा आढळून येतो.

वास्तविक स्वातंत्र्य कोणते ? संक्षिप्तमध्ये आपण असे म्हणू शकतो की, खरे स्वातंत्र्य त्या स्थितीची प्राप्ती अथवा त्या वातावरणाची निर्मिती आहे ज्यात मानवीय गुणवैशिष्ठयांना फुलण्याची, वाढण्याची आणि विकसित होण्याची संधी मिळावी. ह्या परिस्थितीत मानवता जागृत होते आणि तिला शक्ती व बळ मिळते. मानवास सामान्य पशुंच्या श्रेणीमध्ये ठेवून त्याच्या विषयी आणि त्याच्या मागण्यांच्या बाबतीत एखादा निर्णय घेणे म्हणजे अज्ञाना व्यतिरिक्त दुसरे काही नाही. मानवास जगामध्ये विशिष्ट स्थान प्राप्त आहे. त्याची काही वैशिष्टये त्याला अन्य पदार्थांपासून आणि सजीवांपासून वेगळे करतात. मानवीय वैशिष्टयांना समजणे आणि त्यांच्या मागण्यांकडे आदराने पाहणे आपले कर्तव्य बनते. ज्या दृष्टिकोनामुळे मानवीय वैशिष्टयांना बळ मिळण्याऐवजी अधिकांश त्यांना आघात पोहोचविण्यात आला आहे. वंश, वर्ण, भाषा, देश, भौगोलिक सीमा आणि भौतिक हितांच्या पक्षपाताने कुठाराघातात मोठ्या प्रमाणात भाग घेतला

आहे. परिणामस्वरुप मानवतेला प्रोत्साहन मिळणे, विकसित होणे आणि सर्वोच्च स्थान प्राप्त करण्याची फारच कमी संधी मिळाली आहे. लोकांची बुध्दी आणि विवेक इतकी नष्ट झाली आहे की ते मानवतेच्या वेदनेकडे आणि विव्हळण्याकडे अजिबात लक्ष देऊ शकले नाहीत. अशा विश्वाला सूर्य व चंद्र नियमितपणे प्रकाशित करतात. जिथे वारा ढगांना लोटून आणतो आणि भूमि सिंचित करतो आणि धरती जिथे खाद्य पदार्थ व अन्न उगविते, ते जग कलह व असंतोषाने भरून गेले. अशांती आली, वैमनस्याला चालना मिळाली, नरसंहार झाले, मानव विभिन्न टोळ्यांमध्ये आणि गटांमध्ये विभक्त होऊन तो स्वत:चाच वैरी बनला.

इतिहासात रोमन एम्पायरला मोठे महत्व दिले जाते. निश्चितच त्या समाजात विविध बंश एकत्र होते. विविध वर्ण आणि भाषांचे लोक एकत्र होते. परंतु मानवता आणि मानवीय संबंध त्याच्या एकतेचा पाया नव्हता. त्यांना परस्पर जोडून ठेवणारी एखादी उत्तम व उच्च धारणा देखील नव्हती. तिथे जी गोष्ट दिसून येते ती आहे वर्गिक विभाजन. संपूर्ण समाज दोन वर्गांमध्ये विभागला गेला होता. एकीकडे कुलीन वर्ग होता तर दुसरीकडे दास व गुलामांचा वर्ग होता. एका वर्गात वंशाने श्रेष्ठ व प्रतिष्ठित असण्याची आणि अन्य वंशांना हीन समजण्याची भावना कार्यरत होती. रोमन वंशजांना श्रेष्ठत्व लाभले होते. तो नेतृत्व व श्रेष्ठतेच्या पदावर आरुढ होता. इतरांची दशा गुलामांपेक्षा वेगळी नव्हती.

हेच हृदय विदारक दृष्य आपणास ब्रिटीश एम्पायरमध्ये पाहावयास मिळते. याचा पाया सुध्दा इंग्रज जातीचे श्रेष्ठत्व आणि वर्चस्वाच्या दुराचारावर रचला गेला. आणि हीच अवस्था इतर युरोपियन राज्यांची देखील होती. साम्यवादाने वचन अवश्य दिले आहे की, त्याने कृत्रिम भिंतीना उद्ध्वस्त करण्याचा विडा उचलला आहे. वर्ण असो की वंश, जात असो की देशासंबंधी पक्षपात तो त्यांना मौलिक महत्वाची गोष्ट समजणार नाही. परंतु इथे सुध्दा मानव - मैत्रीच्या व्यापक आधाराचा आदर केला गेला नाही. इथे 'वर्गिक विभाजना' व्यतिरिक दुसरी

कोणतीही गोष्ट प्रबळ होत असल्याची दिसत नाही. साम्यवादी समाज प्राचीन रोमन समाजाचेच दुसरे रुप आहे. अशा प्रकारच्या संकुचित समाजाकडून याशिवाय दुसरी कोणतीही आशा केली जाऊ शकत नाही की, मानवाच्या पवित्र, उच्च आणि व्यापक भावनांना शक्ती मिळण्याऐवजी पाशवी आणि हीन प्रवृत्तींना बळ मिळावे आणि मानवता आपल्या ठिकाणी विव्हळत व अखेरची घटका मोजत राहावी. ज्या विचारधारेच्या दृष्टीने संपूर्ण मानवी इतिहास पोटा पाण्याचा शोध आणि आर्थिक संघर्षाच्या कथे व्यतिरिक्त दुसरे काहीही नाही आणि ज्याच्या दृष्टिकोनातून मानवाची मौलिक आवश्यकता आणि अपेक्षित वस्तु-भोजन, घर आणि कामवासनेच्या तृप्ती व्यतिरिक्त इतर काहीही नाही. त्या विचारधारेला मानवतेसाठीचे महान वरदान समजणे मानवतेची अशी उपेक्षा व अपमान आहे ज्यावर कितीही खेद व्यक्त केला तरीही तो कमीच आहे.

वर म्हटल्याप्रमाणे खरे स्वातंत्र्य म्हणजे मानवाच्या सर्वोच्च गुण वैशिष्टयांना प्रबळ होण्याची संधी प्राप्त होणे, आणि त्यांचा विकास होणे. त्यांच्या विकासाचा मार्ग प्रशस्त व्हावा असे वातावरण मिळावे. कोणताही अडथळा शिल्लक राहू नये. हे वातावरण अथवा समाज अशा व्यापक नियमांवर आधारित असावे ज्यांच्यापुढे तुच्छ व लहान-सहान गोष्टींना फारसे महत्व नसेल. ज्यामध्ये प्रत्येक वंश, प्रत्येक जाती, प्रत्येक भाषा आणि वर्णाच्या लोकांना प्रवेश असावा. ज्यात प्रेम व शुध्द हृदय तेच्या एका पवित्र धाग्याने सर्वांना परस्पर जोडून ठेवलेले असावे. मानवीय वैशिष्टये आणि जीवनातील सर्वोच्च मूल्यांना आणि मान्यतांना प्राथमिकता व प्राधान्य मिळावे. एखाद्या विशिष्ट कुळात अथवा देशात जन्माला आल्या कारणाने एखाद्याला श्रेष्ठ समजण्याऐवजी मानवतेच्या दृष्टीने श्रेष्ठ असणाऱ्यालाच श्रेष्ठ मानावे. मानव आपल्या सारख्याच मानवाच्या दास्यत्वातून मुक्त व्हावा. त्याचा आत्मा स्वतंत्र आसावा. त्याच्यावर कोणाचाही अनुचित प्रतिबंध नसावा, त्याच्या मन व मश्तिष्का वर कोणाचा दबाव नसावा. तो ऐच्छिक मार्गावर स्वतंत्र्यपणे चालू शकावा. विनाशाच्या मार्गावर नव्हे तर

मानवतेला वास्तविक पणे वांछनीय असलेल्या मार्गावर त्याच्या स्वत:साठी आणि सर्व जगासाठी हितकारक आणि कल्याणकारी असलेल्या नीतीचा त्याने अवलंब करावा.

सर्व मानव आपसात भाऊ-भाऊ आणि एकाच मार्गाचे अनुगामी आहेत, त्यांचे लक्ष्य एक आहे. त्यांचा ईश्वर एक आहे. तोच एकमात्र सर्वांचे इष्टपूज्य व आराध्य आहे. ही वास्तविकता लोकांना ज्या वातावरणात सापडत असेल तेच वातावरण खऱ्या स्वातंत्र्याचे सूचक असू शकते.

"समाने सह वो योवत्रे युनज्मि" अर्थात - "तुम्हाला एकाच जोखडात जोडतो. एकाच प्रेम पाशात, स्नेह बंध नात बांधतो." (अर्थव ३:३०-६) वैयक्तिक लक्ष्याच्या प्राप्तीमध्ये मानव मानवासाठी बाधा बनून उत्पन्न झाला नसून स्वाभाविक व नैसर्गिक दृष्टीने मनुष्य मनुष्यकरिता सहायक बनून जन्म घेत असतो. मानव विकासाच्या मार्गात आणि मानवतेच्या वास्तविक लक्ष्यप्राप्तीमध्ये जो प्रतिबंध व नियम बाधक ठरतो आणि जी भावना मानवास मानवता व इतर मानवांपासून वेगळे करते आणि एकमेकांचे वैरी बनविते ती पथभ्रष्टता आहे. अत्याचार आहे, उदंडता व अज्ञान आहे आणि विश्वासाठी अभिशाप आहे. ती मानवाच्या वास्तविक स्वातंत्र्याकरिता घातक आहे. त्यापासून सतर्क राहणे आणि त्याच्या निवारणाची चिंता करणे प्रत्येक मानवाचे कर्तव्य असते. वेदात म्हटले आहे.

**सहृदय सामनस्य विद्वेषम कृणोमि वः । अन्यो अन्यमभि हर्यत वत्सं जातमिवाहन्या ॥** *(अर्थव ३:३०.१)*

"हे मानवा ! मी तुला सहृदयतेने मुक्त करतो, तुम्हा सर्वांना एक हृदय असणारे समान हृदय असणारे बनवितो. तुम्हा सर्वांना एक चित्त असणारे आणि आपसातील द्वेषभावरहित करतो. हे जगातील लोकहो ! ज्याप्रमाणे नवजात वासराच्या प्रेमापोटी गाय धावत येते त्याप्रमाणे तुम्ही देखील एकमेकांसाठी धावून या."

इस्लामच्या दृष्टीने वास्तविकपणे अशाच वातावरणाची निर्मिती व्हावी ज्यात मानवीय वैशिष्टयांना विकसित होण्याची संधी लाभावी. इस्लाम मानवीय वैशिष्टयांना महत्व देतो. तो त्यांना विकसित करू इच्छितो. तो मानवांना मानवतेपासून वंचित करणाऱ्या आणि मानवांना परस्पर प्रेम व बंधुत्वाच्या सूत्रात जोडण्याऐवजी त्यांना एकमेकांचे दास वा वैरी बनविणाऱ्या अडथळ्यांशी दोन हात करू इच्छितो. ज्या मार्गावर मानवाने सहजतेने चालावे, ज्याचा अवलंब करून मानव जीवनास सार्थक बनवू शकतो, ज्या मार्गावर चालून तो अत्युच्च लक्ष्य प्राप्त करू शकतो, असा मार्ग इस्लाम प्रशस्त करू इच्छितो. या मार्गक्रमणामुळे मानव प्रकृतीमध्ये निर्धारित उद्देशांची पूर्तता होते आणि त्याच्या मनातील अंतर्गत भावांना शांती व बळ मिळते.

इस्लाम वास्तविक स्वातंत्र्याचा आमंत्रणदाता आहे. म्हणून स्वभावता तो मानवांपुढे एक असे लक्ष्म व जीवन उद्देश सादर करतो जो केवळ सत्यच नसून सर्व मानवांकरिता मान्य देखील असू शकतो. ईश्वराच्या मुखांक्षेची प्राप्ती आणि संपूर्ण मानव लोकांच्या कल्याणासाठी सेवाकार्याचा निर्वाह. यात फक्त धर्मांचे वास्तविक मर्म दडलेले नसून एकमेव हे लक्ष्य मानवास उंच करतो आणि जगातील मनुष्यांना एका समपातळीवर आणून उभे करतो. मग मानवा मानवात कोणाताही भेदभाव रहात नाही. लक्ष्य आणि उद्देशाचे पावित्र्य संपूर्ण मानव जीवनाला पवित्र बनविते. इस्लामच्या नियमित समाजात आपण मक्केचे अबू बक्र, हबशाचे बिलाल, रोमचे सुहेब आणि फारसचे सलमान (रिज.) यांना एकाच रांगेत पाहतो. उद्देशाची एकता आणि भाव पावित्र्याने त्यांना एक बनविले आहे. या एकता व एकात्मतेस वर्णभेद भंग करू शकला नाही आणि देश व भाषेची भिन्नता कोणताही आघात पोहचू शकली नाही. मग वैयक्तिक स्वरुपात यापैकी प्रत्येकास ती महानता व श्रेष्ठता प्राप्त झाली आणि मानवतेच्या दृष्टीने ते इतके उच्च बनले ज्यावर मानवता सदैव गर्व करीत राहीली आहे. इस्लाम त्या सर्व बंधनापासून मानवतेची मुक्तता करू इच्छितो. ज्यात अज्ञान त्यास

जखडलेला पाहू इच्छितो मग ते बंधन खोट्या व सत्यहीन विचारांचे आणि धारणांचे का असेना अथवा ते बंधन अनुचित सामाजिक रीती-परंपरा आणि परिपाटींचे का असेना, किंवा एखाद्या विशिष्ट वर्गाच्या व जातीच्या अनुचित आणि असंगत नीती व अत्याचाराशी संबंध असलेले बंधन असो. मानवतेला ज्यामुळे क्षति पोहोचते, मानवाचे स्वाभाविक स्वातंत्र्य ज्यामुळे भंग होत असेल असे सर्व नियम, प्रतिबंध, व्यवस्था आणि पध्दती मानवाकरिता साखळदंड व बेड्या आहेत. या बेड्यांना तोडून टाकणे मानवतेची सर्वात मोठी सेवा आहे. याच्यापेक्षा श्रेष्ठ जनसेवेचे कोणतेही कार्य असू शकत नाही.

जो पर्यंत मानवास तो जन्मसिध्द अधिकारी असलेले आदराचे स्थान मिळवून दिले जात नाही तो पर्यंत राजकीय, आर्थिक व सामाजिक दृष्टीने देखील मानवजातीसाठी कसलेही विश्वसनीय कार्य शक्य नाही. त्यास मौलिक अधिकारापासून वंचित करून त्याला संकटांपासून व अडथळ्यांपासून मुक्त केले जाऊ शकत नाही. जो पर्यंत मानव मानवतेचे मूल्य स्वीकारत नाही तो पर्यंत जीवनाच्या कोणत्याही क्षेत्रात न्यायाची स्थापना होणे शक्य नाही. उत्तमोत्तम नियम बनविले जाऊ शकतात, कोणत्याही व्यक्ती अथवा विशिष्ट वर्गाकडून मोठमोठे दावे देखील केले जाऊ शकतात, परंतु जो पर्यंत मानवतेच्या दृष्टिकोनातून मोठ्या व मौलिक समस्येवर तोडगा काढला जाऊ शकत नाही तो पर्यंत या नियम व दाव्यामुळे मानवाच्या समस्येचे निराकरण होऊ शकत नाही. ती समस्या अशी की, मानव आपल्या वैयक्तिक, जातीय वा प्रादेशिक वादापेक्षा वरचढ मानवतेच्या हिताची इच्छा बाळगू लागावा. जो पर्यंत या वैशिष्टयाचा प्रादुर्भाव होत नाही तो पर्यंत समस्या निर्माण होत राहतील, अडथळे उत्पन्न होत राहतील. अशास्थितीत मानवतेची नौका कधीही आपला प्रवास पूर्ण करु शकणार नाही.

इस्लाम या मौलिक समस्येचे समाधान आहे. तो लोकांना अशी धारणा देतो की, त्यांनी भौतिकवादापासून मुक्ती मिळवून विस्तृत व खुल्या

वातावरणात श्वास घ्यावा. इस्लामनुसार इहलोकचे नाते परलोकांशी जोडल्याशिवाय व एक ईश्वराला आपल्या जीवनात समाविष्ट न करता मानवतेच्या दृष्टीत व्यापकता येऊच शकत नाही. या व्यतिरिक्त मानवदृष्टी सदैव संकुचित राहील. मानव विभिन्न प्रकारच्या पक्षपातांपासून मुक्ती प्राप्त करू शकत नाही. परिणामतः छल, कपट, अवसरवाद, अनाचार, अत्याचार आदि रोग त्याला जडलेले असतील. अशा स्थितीत मानवतेला खरे स्वातंत्र्य आणि मुक्ती मिळणे अथवा त्याला स्वातंत्र्याचा खरा आनंद लुटता येणे आणि स्वातंत्र्याचा संपूर्ण लाभ घेता येणे शक्य नाही. इस्लामने दबावाखाली असलेल्या मानवतेला बंधनांपासून पक्षपातांपासून आणि यातनांपासून मुक्त करण्याचा विडा उचलला आणि मानवतेला वास्तविक स्वातंत्र्य प्रदान करण्याचे दायित्व राखले ही त्याची सर्वात मोठी अविस्मरणीय कामगिरी आहे. कुरआनमध्ये म्हटले आहे.

**ईश्वराची कृपा त्यांच्यासाठी आहे जे या निरक्षर पैगंबर नबीचे अनुयायित्व पत्करतील ज्याचा उल्लेख त्यांना त्यांच्या तौरात व इंजीलमध्ये लिखित स्वरुपात आढळतो. तो त्यांना सदाचाराची आज्ञा देतो, दुराचारापसून रोखतो, त्यांच्यासाठी उत्तम वस्तू वैध करतो व निकृष्ट वस्तू अवैध करतो. आणि त्यांच्यावरून ते ओझे उतरवितो जे त्यांच्यावर लादलेले होते आणि ती बंधने सोडतो ज्यामध्ये ते जखडलेले होते. म्हणून जे लोक याच्यावर श्रध्दा ठेवतील आणि याचे समर्थन व सहाय्य करतील आणि प्रकाशाचे अनुसरण करतील जो याच्याबरोबर अवतरला गेला आहे, तेच सफल होणारे आहेत.**

*- अल आअराफ, १५७*

# विलक्षण प्रभाव

# सीलियाची आत्मकथा

जर मला विचारले जाईल की, इस्लामच्या कोणत्या गोष्टीने मला सर्वाधिक प्रभावित केले, तर माझे उत्तर असेलच, "इस्लामी दुआ." *(ईशस्तुत्या प्रार्थना)*

हे ऑस्ट्रेलियन एक नव मुस्लिम महिला सीलियाचे शब्द आहेत. हे शब्द तिने इस्लामचा स्वीकार केल्यानंतर तिच्या मुखातून बाहेर पडले होते. सीलिया म्हणाल्या, ख्रिस्ती धर्मात देखील 'प्रार्थना' (दुआ) आहेत, मात्र त्या दुआ म्हणजे ईसा मसीह यांच्या माध्यमाने सांसारिक पुरस्कार प्राप्त करण्याची अभिलाषा होय. परंतु इस्लाममध्ये ज्या गोष्टीचे नाव 'दुआ' आहे ते म्हणजे अल्लाहचे गुणगान, प्रशंसा आणि त्याच्यापुढे कृतज्ञता दाखविणे त्याला धन्यवाद देणे आणि आपले सौख्य कोणत्या गोष्टीत आहे हे चांगल्या प्रकारे जाणत असलेल्या सर्वशक्तीमान सत्तेच्या दयाळुपणाची आकांक्षा करणे होय.

सीलियाला जाणीव आहे की त्या वेळी देखील ती मुसलमान होती जेव्हा तिने इस्लामचे अध्ययन सुध्दा केलेले नव्हते आणि तिला आपण मुस्लिम असल्याची माहिती सुध्दा नव्हती.

एक काळ असा होता जेव्हा सीलिया सत्यासाठी व्याकूळ होती. ती ख्रिस्ती धर्मात वाढलेली होती. बालपणापासूनच धर्माच्या बाबतीत विचार करीत होती. सज्ञान झाल्यानंतर ख्रिस्ती धर्मात तिला कसलाही रस किंवा आकर्षण उरले नाही. तिने जेव्हा जेव्हा चर्चच्या शिकवणींच्या बाबतीतं आपल्या एखाद्या शंकेच्या समाधानाकरिता प्रश्न विचारला, तेव्हा तिला ख्रिस्ती जबाबदार व्यक्तींकडून एकच उत्तर मिळाले की, तिने चर्चच्या शिकवणी आणि उपदेसांच्या बाबतीत प्रश्न उपस्थित न करता त्यांच्यावर विश्वास ठेवायला हवा.

सीलियाला ज्या मानसिक व आत्मिक शांतीचा शोध होता, ख्रिस्ती धर्म त्यास संचित करण्यात अपयशी दिसत होता. तिला हवी हवी असलेली गोष्ट कुठे सापडेल याचा तिला अंदाज नव्हता. ज्या व्यक्तीला जीवनात कधीतरी अशा प्रकारच्या समस्यांना तोंड द्यावे लागत असेल अशाच व्यक्तीला तिच्या व्याकुळता व अस्वस्थतेचा अंदाज येऊ शकतो.

सीलियाने जेव्हा कॅथॉलिक धर्म सोडला तेव्हा तो तिच्या जीवनातील सर्वात महत्वाचा निर्णय होता. शांती व आनंद एक ईश्वरावर विश्वास ठेवण्यातच मिळू शकतो याची तिला खात्री होती. तीन ईश्वरांच्या कल्पनेमध्ये तिला शांती कदापि मिळू शकत नाही.

सीलिया ख्रिस्ती धर्माच्या पापाशी संबंधित दर्शन समजण्यात देखील सदैव अपयशी ठरली. मनुष्य प्रत्यक्षपणे बुध्दीच्या प्रतिकूल असलेल्या धारणेचा स्वीकार कसा करतो, असा तिला विचार पडत असे.

सीलियाने ख्रिश्चन धारणांच्या विपरीत जीवनाचा काही नवीन व व्यापक अर्थ ग्रहण केला. जीवनाचा हा नवीन आशय सीलियाला अत्यंत प्रिय होता. सीलियाने स्वतः म्हटले आहे की,

"मला इहलोकांमध्ये प्रत्येक दिशेला एक ईश्वराच्या कार्य साधकतेचा चमत्कार आढळून येतो. माझ्या बुध्दी व चिंतनापेक्षाही पलिकडे परंतु माझ्या डोळ्यांसमोर अशा निशाण्या होत्या, ज्यांची वास्तविकता प्राप्त करण्यासाठी मी उभी राहून त्यांना पाहात होते. वृक्ष, फुल, पक्षी यांची सृष्टी इत्यादी सर्वांचे सामर्थ्य आता माझ्यासाठी एका नवीन अभिव्यक्तीचे होते. मला त्यावेळची गोष्ट देखील आठवते जेव्हा एका बालकास पाहून मी स्वतःला एक प्रश्न विचारला होता की, हे पापाच्या कालिमामध्ये लपेटलेले अस्तित्व आहे काय ? खरे तर त्या समयी मी स्वतःच एक अल्पवयीन बालिका होते. ख्रिस्ती धर्म देत असलेल्या पापाच्या कल्पनेचा मी स्वीकार केला नाही. आता प्रत्येक वस्तू मला सुंदर दिसू लागली होती."

सीलियाला ईश्वराने संवेदनशील हृदय दिले होते, तरीही तिला वास्तविक स्वरुपात खऱ्या धर्मांशी परिचित करविणाऱ्या आणि तिच्या हृदयाला खरा आनंद (समाधान) प्राप्त होईल अशा खरोखरच्या पथ-

प्रदर्शनाची आवश्यकता होती. योगायोगाने या दरम्यान तिच्या मुलीला कुठूनतरी इस्लाम वर एक पुस्तक सापडले. ती ते पुस्तक घेऊन घरी आली. सीलियाने ते पुस्तक पाहिले असता तिला ते आवडले. पुस्तकात जे काही लिहिले होते, तो तिच्या हृदयाचा आवाज होता त्याक्षणी तिला वाटले की, तिला ज्या वस्तूचा शोध होता, कदाचित ती तिला मिळाली.

तिने आणखी बरीच पुस्तके इस्लामच्या विषयावर प्राप्त केली आणि गांभिर्याने त्यांचे अध्ययन केले. सीलियाला आता पूर्ण विश्वास वाटू लागला की, तिच्या आत्म्याच्या गोष्टीचा शोध घेत होता ती त्याला सापडली आहे. तिला आठवले की, ती जेव्हा एक ख्रिस्ती बालिका होती तेव्हा तिच्या शिक्षकांना अध्यापकांनी आणि इतर ख्रिस्ती नेत्यांनी इस्लाम एक हास्यास्पद धर्म असल्याचे तिला पटवून सांगितले होते. परंतु आज इस्लामी पुस्तकांच्या प्रत्यक्ष अध्ययनांने ख्रिस्ती नेत्यांनी तिला इस्लामचा नितांत चुकीचा व अपूर्ण परिचय करून दिल्याचे सिध्द झाले. मनुष्याचा सर्वात मोठा शत्रु स्वतः मनुष्य असल्याचे तिने पाहिले. अज्ञानपूर्ण पक्षपात द्वेष व घृणेमुळे कितीतरी लोक सत्याला समजण्यात आणि त्याचा स्वीकार करण्यात असमर्थ राहिले आहेत. सत्याप्रति शत्रुत्वाचा व्यवहार करून त्यांनी स्वतःशीच शत्रुत्व केले. स्वार्थपरता व पक्षापातात एखाद्याला शांत मनाने गांभिर्य पूर्वक एखाद्या समस्येवर विचार करण्याची संधी फारच कमी मिळते.

सीलियाने काही मुसलमानांना विचार विनिमयाच्या उद्देशाने काही प्रश्न विचारले. तिच्यासाठी हा नवीन अनुभव होता. तिला आपल्या प्रश्नांची तुरंत व स्पष्ट उत्तरे मिळाली. तिचा हा अनुभव आपल्या पूर्वीच्या त्या अनुभांवापेक्षा अत्यंत भिन्न होता जेव्हा ती ख्रिस्ती धर्मांच्या बाबतीत ख्रिस्ती जबाबदार व्यक्तींना प्रश्न विचारून अगदी निराश व दुःखी होत असे.

इस्लामच्या अध्ययनानंतर सीलिया आणि तिची मुलगी दोघींनी इस्लामचा स्वीकार केला. सीलियाने आपले नाव महमूदा आणि आपल्या मुलीचे नाव रशिदा असे ठेवले.

❊ समाप्त ❊